# प्रस्तावना

ग्रंथांचे वाचन किंवा ग्रंथालय व्यवहार ह्या विषयावर आपल्या भाषेत फारच थोडे लिहिले गेले आहे. चिपळूणकरांच्या निबंध मालेतला 'वाचन' हा प्रबंध अशा प्रकारचा उल्लेखनीय आहे. पण ती वजनदार निबंध-माला किंवा त्यातले विद्वत्ताप्रचुर निबंध अलीकडच्या वाचकांच्या किंवा विद्यार्थ्यांच्या परिचयाचे तरी असतील किंवा काय ह्याची शंकाच वाटते. शिवाय आजची हलकी फुलकी ललितशैली वाचण्याचा सराव झालेल्या वाचकांना ही गीर्वाणमिश्र भाषा रुचण्याचा संभवही कमी. पाश्चात्य देशात वाचनावर अनेक मार्गदर्शकपर लेखन उपलब्ध आहे. रेव्हरंड टॉडच्या 'स्टूडंट्स मॅन्युअल' मधल्या प्रकरणापासून तो हॉलब्रुक जॅकसनच्या 'अॅनेटॉमी ऑफ् बिब्लिओ मॅनिया' ह्या सुमारे सातशे पानांच्या ग्रंथापर्यंत ह्या विषयावर विविध प्रकारची अनेक पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. मॉर्टिमर अॅडलरचे 'हाउ टु रीड अ बुक' हे पुस्तक सामान्य वाचकांपासून संशोधक अभ्यासूपर्यंत सर्वांनाच आपापल्यापरी उपयुक्त ठरेल. आपल्या इकडे वाचनाची – विशेषत. शिस्तपर वाचनाची – सवय विशेष जडलेली आढळत नाही. गेल्या पिढीतले डॉ. भांडारकर, तेलंग, मंडलिक, गोखले, बॅ. जयकर व डॉ. आंबेडकर ह्यांचे वाचन आणि त्यासाठी त्यांनी संग्रहित केलेला व्यक्तिनिष्ठ ग्रंथसंग्रह ह्याची माहिती किंवा परिचय असलेल्या व्यक्तींना चालू पिढीच्या अनध्यायाचे आणि ग्रंथदुस्वासाचे आश्चर्य वाटेल. ग्रंथालयीन व्यवहाराचे शास्त्र झाल्यापासून अलीकडे ग्रंथालय शास्त्रावर ग्रंथ लिहिण्यात येत आहेत, पण हे सर्व ग्रंथ तंत्राच्या अवलंबनासाठी असल्यामुळे त्यांचा उपयोग ग्रंथपालनाच्या विद्यार्थ्यांनाच फक्त होऊ शकतो. अमेरिकेमध्ये सामान्य वाचकांसाठी आणि शालेय विद्यार्थ्यांसाठी ग्रंथालयाच्या उपयोगा बाबत सुलभ व सचित्र मार्गदर्शक ग्रंथ उपलब्ध आहेत. आपल्याकडे सार्वजनिक किंवा शालेय ग्रंथालयाच्या उपयुक्ततेची जाणीव व्हावी तितकी नसल्यामुळे अशा प्रकारच्या ग्रंथांची आवश्यकताही कुणाला पटलेली नाही.

श्री. भानु शिरधनकरांनी ह्या दोनही विषयांवर आपल्या सुगम शैलीत लिहिलेले लेखन संकलित करून ही 'पुस्तकांची दुनिया' वाचकांना खुली केली आहे. शिरधनकरांनी आतापर्यंत विपुल लेखन केलेले आहे, पण ते दर्यावर्दी किंवा शिकाऱ्यासारख्या धाडसी जीवनावर. त्याशिवाय वेळोवेळी घेतलेल्या निश्चयरारक मुलाखतींतून अनेक शूर वीरांची शब्द चित्रेही त्यांनी साकार केली आहेत. प्रस्तुत पुस्तक हे मात्र त्यांच्या आज पर्यंतच्या ग्रंथापेक्षा अगदी निराळे आहे. कदाचित हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांच्या ह्या विषयावरच्या ज्ञानाधिकाराबद्दल कोणास शंका येण्याचा संभव आहे. शिरधनकरांच्या मुलाखती व लेखन अनेक वर्षे मी आवडीने वाचत आलेलो होतो. पण १९०० साली ग्रंथपालनाच्या वर्गात विद्यार्थी म्हणून ते जेव्हा दाखल झाले तेव्हा ह्या नामवंत व्यक्तीचे प्रथम दर्शन घडले, आणि नंतर त्यांची अभ्यासू वृत्ती आणि उपजीविकेच्या व्यवसायाशी दूरान्वयानेही संबंध नसलेल्या ग्रंथपालनासारख्या विषयात तादात्म्य पावण्याची प्रवृत्ती पाहून आश्चर्यही वाटले. ह्या वर्गानंतर त्यांची पुष्कळ वेळा भेट झाली तेव्हा त्यांची वाचनाची आवड माझ्या लक्षात आली. पुढे नोकरीत त्यांची मुंबईबाहेर बदली झाल्यामुळे अनेक वर्षे आमचा संबंध दुरावला. सेवानिवृत्तीनंतर मुंबई मराठी ग्रंथसंग्रहाल्यात त्यांनी जेव्हा काम पत्करले तेव्हा पुन्हा आमच्या गाठीभेटी होऊ लागल्या. तेथल्या कारकीर्दीत त्यांनी साहित्यसहकारसाठी स्फुट लेखन केले. त्यांचे अलीकडचे निराळ्या प्रकारचे व उल्लेखनीय लेखन म्हणजे 'ललित'मध्ये प्रसिद्ध झालेले विद्वान साहित्यिकांच्या वाचनविषयक आवडीनिवडी व पद्धतींसंबंधीचे लेख. ह्या लेखांतील काही आठवणी व विचार थोडक्या स्वरूपात ह्या पुस्तकाच्या अखेरच्या प्रकरणात संकलित केलेले असले तरी ते संपूर्णतया ग्रंथनिविष्ट होणे यथार्थ ठरेल.

'पुस्तकांची दुनिया' ह्या पुस्तकाचे दोन भाग पाडता येतील. पहिला भाग ग्रंथालयीन व्यवहारासंबंधीचा आणि दुसरा वाचनासंबंधीचा. पहिल्या प्रकरणात ग्रंथासंबंधी आणि ते संग्रहित करणाऱ्या ग्रंथालयांसंबंधी दिलेली माहिती इतकी मुद्देसूद, आकर्षक आणि बालबोध आहे की, त्यांनी ह्या

वेषयावर एक सुलभ ग्रथ लिहून आपली लोकप्रिय लेखनशैली ह्या कामी ाबवावी आणि स्मृतिकोपात जपून ठेवलेल्या तात्त्विक ज्ञानाला पुन्हा उजाळा द्यावा अशी विनती करावीशी वाटते तज्ञ ग्रथपाल आणि रसिक्णू र चोखदळ वाचक ह्या दोन परस्परविरोधी भूमिकाचा त्याच्या ठाया ालेला समन्वय असल्या लेखनास त्यांना अधिकच समर्थ करील अशा ात्रा वाटते

पुढच्या भागात त्यानी वाचनासबधी विवेचन केलेले आहे ह्या प्रकरणात यानी थोर व विद्वान् लोकाच्या वाचनासबधीची दिलेली माहिती रजक आणि उद्‌बोधक आहे पाचव्या प्रकरणात पुण्याचे मर्मज्ञ ग्रथविक्रेते श्री पा रा दमढेरे ह्याच्या व्यावसायिक आठवणी मुलाखतीच्या स्वरूपात देऊन ह्या रक्ष व्यवसायाच्या 'रोमान्स'ची एक आगळी कथा सागितली आहे आठव्या प्रकरणात लेखकाने प्राजल आत्मकथन करून आपल्या वाचनाच्या छदाची आणि ग्रथसग्रह करण्याच्या वेडाची माहिती दिली आहे अखेरच्या प्रकरणातील विविध वाचनाऱ्या वाचनासबधीची माहिता मात्र फारच त्रोटक आणि तुटक झालेली आहे ग्रथविस्ताराच्या भयाने जरी हा सक्षेप इष्ट वाटला तरी ग्रथाच्या रगतीला मात्र त्यामळे बाध आलेला आहे, असे म्हणावेसे वाटते

श्री शिरवळकराचे हे पुस्तक एकदरीत नावीन्यपूर्ण आहे त्याच्या आजपर्यंतच्या कीर्तीला साजेशा आकर्षक लेखनशैलीत मराठीत अस्पर्शित आणि अनुल्लेखित अशा विषयावर त्यांनी केलेले हे लेखन त्याच्या इतर लोकप्रिय ग्रथाइतकेच रजक आहे त्याचे ह्या विषयाबाबतचे ज्ञान आणि अनुभव इतके गाढ आणि वैशिष्ट्यपूर्ण आहेत की, हा ग्रथ माझ्यासारख्या वाचकाला अपुरा वाटतो एवढीच माझी तक्रार आहे

सिद्धार्थ महाविद्यालय,
मुबई
२३ ९ १९६८

—शा श रेगे

# अनुक्रमणिका

प्रकरण पहिले

# ग्रंथ आणि ग्रंथालये

## १

आमच्या लहानपणी गोष्टींची पुस्तके आम्हाला क्वचितच वाचायला मिळत. वाचायची तर गोष्टच राहू द्या! त्या मानाने आताची मुले केवढी भाग्यवान! अभ्यासाच्या पुस्तकापेक्षा गोष्टींचीच पुस्तके आजकालची मुले अधिक वाचीत असावीत! रंगीबेरंगी चित्रांनी सजविलेली, सुंदर सुंदर कव्हर असलेली गोष्टींची, कवितांची, गाण्याची पुस्तके उघडून त्यात रंगून गेलेली मुले पाहिली, की मला कधी कधी त्यांचा हेवा सुद्धा वाटतो. अहो नुसती पुस्तकेच कशाला? मुलांसाठी आता वर्तमानपत्रेसुद्धा खास बालविभाग छापतात. मासिकांतून बालवाङ्मया नि मुलांची सदरे नसली तर ती मासिके कोणी घेत नाहीत. शाळाशाळांतील मुलांची ती ग्रंथालये, तेथील मांडण्यांवरून लावून ठेवलेली ती चित्रविचित्र पऱ्यांची, फुलपाखरांची आकर्षक पुस्तके! तेथील छोटी छोटी टेबले, खुर्च्या! त्यावर आरामात बसून पुस्तकात गुंग होऊन गेलेली बालवाचक मंडळी! वाहवा! केवळ मुलांचीच पुस्तके काढणारे प्रकाशक आता काय थोडे थोडके आहेत! आणि पुस्तकांच्या त्या जत्रा. तिथे पुस्तकासाठी आईवडिलांशी हट्ट करताना दिसणारी छोटी मोठी मुले!

सर्वच काही न्यारे! माझ्या लहानपणी जर कधी गोष्टींच्या पुस्तकासाठी मी हट्ट केला असता, तर आईने पाठीत रट्टाच घातला असता माझ्या!

लहानपणी चुकून कधी गोष्टीचं एखाद पुस्तक हाती पडलं तर कोण आनंद व्हायचा मला. कुठं तरी कोनाड्यात जाऊन मी बसायचा आणि त्याची पाने उलटू लागायचा. मला पक्कं आठवतं, लहानपणी पुस्तकाची पाने मी नेहमी डाव्या हातानं उलटीत असे.

मुलाच्या हाती पुस्तक आल्यानंतर ती पाने कशी उलटतात ते तुम्ही कधी निरखून पाहिलं आहे?

नाही ना?

पण मी पाहिलं आहे. बहुतेक मुलं डाव्या हातानं पानाच्या तळाला किंवा मध्यावर धरून ती पाने उलटतात. पुस्तकाची पाने नीट कशी उलटावीत, हे त्यांना मुळी कधी कुणी दाखवलेलंच नसतं, हे एक! आणि पुस्तकाची पाने वरच्या बाजूस धरून उलटायची म्हटलं तर कधी कधी त्यांचे छोटे हात, त्यासाठी अगदी तोकडे पडतात हे दुसरं! पण डाव्या हाताने पानाच्या खालच्या बाजूस धरून ती उलटणे हे मात्र बरोबर नसतं.

पुस्तकाची पाने उलटण्याची खरी पद्धत म्हणजे पुस्तक नीट टेबला-वर किंवा मांडीवर धरून, पानाचा उजवा कोपरा वरच्या बाजूस धरून ती उलटीत जाणे ही होय. आपल्या तर्जनीने (आंगठ्याजवळच्या पहिल्या बोटाने) पान हळूच वर उचलायचे आणि नंतर दुसऱ्या बोटांनी ते पुढे ढकलायचे. उजव्या हाताची बाजू ही याबाबत उजवी (खरी) बाजू हे नेहमी लक्षात ठेवलेले बरे.

काही मुलांना, का, मोठ्या माणसांना सुद्धा, पुस्तकाची पाने उलट-ताना बोटांना थुंकी लावण्याची घाणेरडी सवय लागलेली असते. प्रत्येक

पान उलटताना त्याना मुळी जिभेला बोट लावल्याशिवाय भागतच नाही. यामुळे पुस्तकाची पाने तर घाण होतातच, पण तिथला मळ सुद्धा आपल्या जिभेला लागून जातो हे त्याच्या लक्षात येत नाही.

काही लोक पाने उलटताना ती बोटाच्या चिमटीत पकडून वाकवतात. त्यामुळे पानाचे कोपरे मोडतात; पण काही लोक मुळी खुणेसाठी पानाचे कोपरेच मोडून ठेवतात. मला सुद्धा पूर्वी ही सवय होती. माझी ती सवय पाहून माझ्या एका रसिक मित्राने एका पातळ हस्तिदंती पट्टीवर सुंदर तरुणीचे चित्र काढून ती पट्टी पुस्तकात खूण म्हणून वापरण्यासाठी मला दिली होती. पण मला काही त्याची ती सूचना पटली नाही. ती हस्तिदंती पट्टी टाकून मी आपला पानाचे कोपरेच मोडणे जास्त पसंत करीत असे. पानाचा कोपरा मोडताना, त्या पुस्तकाच्या विद्वान लेखकाचा मी जणू कानच पिरगळीत आहे असा मला आनंद वाटायचा !

पाने उलटण्यापूर्वी पुस्तक आधी नीट उघडायलाही शिकल पाहिजे. पुष्कळ मुले (आणि मोठी माणसे देखील) पुस्तक हातात पडताच ते दोन्ही बाजूंना पार ताणून उघडतात. त्यामुळे त्या पुस्तकाचा कणाच साफ मोडून जातो. पण अगोदर पुस्तकाचा कणा म्हणजे काय ते आपणास ठाऊक असले पाहिजे. पुस्तके जेव्हा आपण कपाटात किंवा मांडणीवर उभी लावून ठेवतो, तेव्हा समोरून पुस्तकाची जी बाजू आपल्या नजरेस येते ती बाजू म्हणजे पुस्तकाचा कणा होय.

पुस्तकाच्या एकंदर बांधणीमध्ये किंवा शिवणीमध्ये त्याच्या कण्याचा हा भाग बराच महत्त्वाचा असतो. पुस्तक फाटते किंवा सुटते ते या कण्यातूनच. हा कणा अधिक टिकाऊ बनावा म्हणून सुरवातीलाच थोडीशी काळजी घेतलेली बरी. यासाठी एखाद्या टेबलावर पुस्तक

कण्याच्या भागावर उभे धरावे म्हणजे त्याचे तोंड किंवा उघडणारी बाजू वर होईल. मग त्या पुस्तकाच्या दोन्ही बाजूची कव्हर खाली पाडून टेबलाच्या माथ्याला लागेपर्यंत दाबावीत. पुस्तकातील पाने यामुळे थोड-थोडी एकमेकापासून अलग होऊन उभी राहतील. प्रथम त्यातील उजव्या बाजूची काही पाने खाली कव्हराकडे दाबावीत. हाताचे मधले बोट स्वच्छ पुसून, पुस्तकाच्या कण्याजवळच ही पाने दाबावीत. एका वर्ळी पाच किंवा दहा पाने एकत्र धरून अशी दाबीत पुस्तकाच्या साधारण मधल्या पानापर्यंत यावे. नतर डाव्या बाजूकडील पाने अशीच दाबून मध्यापर्यंत आणावीत. म्हणजे पुस्तकाची अर्धी पाने डावीकडे व अर्धी उजवीकडे होऊन पुस्तक विभागले जाईल. आणि पुस्तकाची बाधणी थोडी सैल होऊन ते पुस्तक दीर्घ काळपर्यंत टिकू शकेल

पुस्तक हाताळताना शक्य तो आपले हात स्वच्छ आहेत की काय याकडे लक्ष ठेवणे आवश्यक असते. विशेषत ग्रयाल्यातील किंवा इतरा-कडून मागून आणलेली पुस्तके हाताळताना अशी काळजी घेणे इष्ट असते. कारण पुस्तके मळकी करून परत दिलेली दिसल्यास मग इतर लोक आपणास पुस्तके उसनी द्यायचे बद करतील.

लहानपणी जिथे मला पुस्तकेच वाचायला मिळण्याची पचाईत असे तिथे वाचनाबाबत मार्गदर्शन तरी कोण करणार? आणि आज सुद्धा पुस्तकाची इतकी सुनत्ता झाली आहे नि मुले पुस्तके मोठ्या आनदाने वाचताहेत म्हणून ती कशी वाचावीत आणि हाताळावीत अगर ग्रथा-लयातून ती कशी निवडून शोधून आणावीत, कशी अभ्यासावीत याबद्दल त्याना कुणी काही सागत असेल तर शपथ! अलीकडे काही विद्वान मडळींना भेटून वाचनाबाबत त्याना लहानपणी कुणी मार्गदर्शन केले होते की काय, याबद्दल माहिती मिळवण्याचा मी प्रयत्न केला होता.

पण त्यापैकी बहुतेक सर्वांनाच वाचनाबाबत कसलंच मार्गदर्शन मिळालेलं नव्हतं. स्वतःचे वाचन स्वतःच्याच अनुभवाने त्यांनी वाढवलेले होते आणि लहानपणी त्यांना जर वडील माणसांनी अगर गुरुजनांनी नीट मार्गदर्शन केले असते तर उपयुक्त आणि बहुमोल असे कितीतरी अधिक वाचन त्यांना करता आले असते असे त्यांचे मत पडले

वाचनाबद्दल जाऊ द्या! पण पुस्तकाबद्दल तरी थोडी फार माहिती लहानपणी मुलांना मिळायला पाहिजे की नको! पण ती तरी कुठे मिळतेय कधी? परवा माझ्या धाकट्या मुलाच्या हातात मी एक पुस्तक पाहिले त्याने आपल्या शाळेच्या ग्रंथालयातून ते आणले होते. मी त्याला म्हटले, 'या पुस्तकाचा संपूर्ण मथळा काय आहे रे?'

पुस्तकाच्या मुखपृष्ठाकडे पाहून तो म्हणाला, 'बिरबल आणि बादशहा!'

मी म्हटले, 'हा कुठला संपूर्ण मथळा?'

त्याला आश्चर्य वाटले, 'म्हणजे, हा मथळा नव्हे?'

त्याच्या हातातील पुस्तक मी उघडले. आतील पहिले कोरे पान उलटले आणि पुस्तकाच्या नावाचे पान काढले. 'हा बघ, संपूर्ण मथळा' मी त्याला म्हटले

'मग हेच नाव मी सांगितलं ना?'

"पण तू फक्त नाव सांगितलंस त्या नावाखाली काय म्हटलं आहे ते कुठे सांगितलंस? 'बादशहा अकबर आणि त्याचा सेवक बिरबल यांच्यातील चतुर विनोदी संवाद' असं त्या नावाखाली लिहिलेलं आहे ना? तिकडे कुठं तू लक्ष दिलंस? या पुस्तकाच्या संपूर्ण मथळ्यामध्ये याचा समावेश होत नाही का?"

माझ्या मुलाला मोठी मौज वाटली.

कण्याच्या भागावर उभे धरावे म्हणजे त्याचे तोंड किंवा उघडणारी बाजू वर होईल मग त्या पुस्तकाच्या दोन्ही बाजूची कव्हर खाली पाडून टेबलाच्या माथ्याला लागेपर्यंत दाबावीत पुस्तकातील पाने यामुळे थोड थोडी एकमेकापासून अलग होऊन उभी राहतील प्रथम त्यातील उजव्या बाजूची थोडी पाने खाली कव्हराकडे दाबावीत हाताचे मधले बोट स्वच्छ पुसून, पुस्तकाच्या कण्याजवळच ही पाने दाबावीत एका वेळी पाच किंवा दहा पाने एकत्र धरून अशी दाबीत पुस्तकाच्या साधारण मधल्या पानापर्यंत यावं नतर डाव्या बाजूकडील पाने अशीच दाबून मध्यापर्यंत आणावीत म्हणजे पुस्तकाची अर्धी पान डावीकडे व अर्धी उजवीकडे होऊन पुस्तक विभागले जाईल आणि पुस्तकाची बाधणी थोडी सैल होऊन ते पुस्तक दीर्घ काळपर्यंत टिकू शकेल

पुस्तक हाताळताना शक्य तो आपले हात स्वच्छ आहेत का काय याकडे लक्ष ठेवण आवश्यक असते विशेषत ग्रथालयातील किंवा इतरा कडून मागून आणलेली पुस्तके हाताळताना अशी काळजी घेण इष्ट असते कारण पुस्तक मळकी करून परत दिलेली दिसल्यास मग इतर लोक आपणास पुस्तके उसनी द्यायच बद करतील

लहानपणी जिथ मला पुस्तकच वाचायला मिळण्याची पचाईत असे तिथ वाचनाबाबत मार्गदर्शन तरी कोण करणार? आणि आज सुद्धा पुस्तकाची इतकी सुबत्ता झाली आहे नि मुले पुस्तक मोठ्या आवडीन वाचताहेत म्हणून ती कशी वाचावीत आणि हाताळावीत अगर ग्रथा ल्यातून ती कशी निवडून शोधून आणावीत, कशी अभ्यासावीत याबद्दल त्याना कुणी काही सागत असेल तर शपथ! अलीकडे काही विद्वान मडळींना भेटून वाचनाबाबत त्याना लहानपणी कुणी मार्गदर्शन केले होते का काय, याबद्दल माहिती मिळवण्याचा मी प्रयत्न केला होता

पण त्यापैकी बहुतेक सर्वांनाच वाचनावाबत कसलंच मार्गदर्शन मिळालेलं नव्हत. स्वत:चे वाचन स्वत च्याच अनुभवाने त्यांना वाढवलेले होते आणि लहानपणी त्याना जर वडील माणसानी अगर गुरुजनानी नीट मार्गदर्शन केले असते तर उपयुक्त आणि बहुमोल असे किती तरी अधिक वाचन त्याना करता आले असते असे त्याचे मत पडले.

वाचनाबद्दल जाऊ द्या ! पण पुस्तकांनदल तरी थोडी फार माहिती लहानपणी मुलाना मिळायला पाहिजे की नको ! पण ती तरी कुठे मिळतेय कधी ? परवा माझ्या धाकट्या मुलाच्या हातात मी एक पुस्तक पाहिले त्याने आपल्या शाळेच्या ग्रथालयातून ते आणले होते. मी त्याला म्हटले, ' या पुस्तकाचा सपूर्ण मथळा काय आहे रे ?'

पुस्तकाच्या मुखपृष्ठाकडे पाहून तो म्हणाला, ' बिरबल आणि बादशहा !'

मी म्हटले, ' हा कुठला सपूर्ण मथळा ?'

त्याला आश्चर्य वाटले, ' म्हणजे, हा मथळा नव्हे ? '

त्याच्या हातातील पुस्तक मी उघडले. आतील पहिले कोरे पान उलटले आणि पुस्तकाच्या नावाचे पान काढले. ' हा बघ, सपूर्ण मथळा ' मी त्याला म्हटले.

' मग हेच नाव मी सागितल ना ? '

" पण तू फक्त नाव सागितलस. त्या नावाखाली काय म्हटल आहे ते कुठे सागितलस ? ' बादशहा अकबर आणि त्याचा सेवक बिरबल याच्यातील चतुर विनोदी सवाद ' अस त्या नावाखाली लिहिलेल आहे ना ? तिकडे कुठ तू लक्ष दिलस ? या पुस्तकाच्या सपूर्ण मथळ्यामध्ये याचा समावेश होत नाही का ? "

माझ्या मुलाला मोठी मौज वाटली.

पुस्तकाच्या या पानाला मथळ्याचे पान म्हणतात. त्या मथळ्याखाली, थोडे अंतर सोडून लेखकाचे नाव दिलेले असते त्या नावाखाली प्रस्तावना लिहिणाराचे नाव आणि त्याखाली पानाच्या तळाजवळ प्रकाशक आणि प्रकाशनस्थळाचे नाव दिलेले असते. कधी कधी प्रकाशन-स्थळाचे नाव याच पानाच्या मागच्या बाजूसही दिलेले असते

प्रकाशन स्थल म्हणजे जिथे ते पुस्तक प्रसिद्ध झाले नि जिथून ते विकले गेले ते ठिकाण प्रकाशक म्हणजे पुस्तक प्रसिद्ध करणारा *गृहस्थ अगर संस्था* पुस्तक *लिहिणाऱ्या गृहस्थाला*, प्रकाशक ते लिहिल्याबद्दल पैसे देत असतो त्या पैशाला आता मानधन म्हणतात असायचे दोनतीनशेच रुपये ! पण म्हणायचे मात्र मानून धनून ! पुस्तकात आणि त्याच्या मुखपृष्ठावर जी चित्रे असतात, ती काढणाऱ्या चित्रकारालाही प्रकाशकाकडून मोबदला मिळतो पुस्तकाची छपाई प्रकाशकच करून घेतो बाधणीही तोच करवून घेतो आणि जाहिरात आणि विक्रीसुद्धा तोच करतो

प्रकाशकाने आपले नाव मथळ्याच्या या पानावर छापलेच पाहिजे असा नियम आहे कधी कधी या नावाखाली प्रकाशनाचे साल पण दिलेले असते पण पुष्कळ वेळा हे साल त्या पानाच्या मागील बाजूसच छापलेले असते या सालाची नोंद वाचकाच्या दृष्टीने महत्त्वाची असते कारण त्यावरूनच त्या पुस्तकातील माहिती ताजी आहे की जु झालेली आहे हे वाचताना कळून येत पुस्तक प्रसिद्ध झाल्याचे सा जितके जुने, तितकी त्यातील माहिती जुनी, हे क्रमाने आलेच

मथळ्याच्या पानाच्या मागील बाजूस, प्रकाशकाचे नाव व पत्ता जस देण्यात येतो, तसेच पुस्तकात चित्र असल्यास ती काढणाऱ्या किंव मुखपृष्ठ तयार करणाऱ्या चित्रकाराचे नाव, आवृत्तीची नोंद, कधी कधं

काढलेल्या प्रतींची संख्या, पुस्तकाचे हक्क कुणाकडे आहेत ते व मुद्रकाच्या नावाची म्हणजे ज्या छापखान्यात पुस्तक छापले गेले त्याच्या मालकाची नोंद आढळते. ही सगळी माहिती मोठी उपयोगी असते.

मथळ्याच्या पानानंतरचे हे पान जवळ जवळ कोरेच आहे. त्यावर फक्त एकच ओळ छापलेली आहे. 'माझ्या प्रिय मातेच्या स्मृतीस!' ही ओळ म्हणजे अर्पणपत्रिका होय. ज्या व्यक्तीबद्दल काही प्रेम, कृतज्ञता व्यक्त करायची असेल अशा जिवंत वा मृत व्यक्तींसही लेखकांनी आपल्या कृती अशा रीतीने अर्पण केलेल्या असतात. अर्पण-पत्रिका ही अशी कधी टीचभर तर कधी पानभर सुद्धा असू शकते. पण आता पानभर अर्पणपत्रिका मागे पडल्या आहेत. आताच्या जमान्यात सगळे कसे सुटसुटीत असावे लागते.

अर्पणपत्रिकेनंतर पुस्तकात आलेल्या सर्व मजकुराची व प्रकरणाची यादी दिलेली असते. हिला म्हणतात अनुक्रमणिका. अनुक्रमणिकेमध्ये प्रत्येक प्रकरणाचे नाव व ते कुठल्या पानावर छापले आहे, त्या पानाचा अंक दिलेला असतो.

लेखक नवीनच असला तर तो कधी कधी दुसऱ्या थोर जाणत्या माणसाकडून त्या पुस्तकाचे विवेचन करणारा व प्रोत्साहन देणारा असा मजकूर लिहून घेऊन तो पुस्तकाच्या सुरुवातीस छापतो. या मजकुरास प्रस्तावना असे म्हणतात. प्रस्तावना, तसेच लेखकाने स्वतःबद्दल सांगितलेला व साहाय्यकाचे आभार मानणारा असा थोडा मजकूर (याला 'हृद्गत' वगैरे सारखे नाव देतात.) प्रकाशकाचे काही म्हणणे असले तर (प्रकाशकाचे दोन शब्द) वगैरे सारख्या सगळ्या गोष्टींचा अनुक्रमणिकेत कधी कधी अंतर्भाव करण्यात येतो व नंतर पुस्तकातील एकेक प्रकरणाचे नाव व त्याची पाने क्रमवार दिलेली असतात.

पुस्तकाच्या सुरुवातीस जशी प्रस्तावना, उपोद्घात, अनुक्रमणिका, चुकांचे शुद्धिपत्रक वगैरे देण्यात येते, तसे शेवटी परिशिष्ट ( म्हणजे *त्याच विषयावरील अधिक माहिती* ) व त्या विषयावरील इतर पुस्तकांची यादी, तसेच पुस्तकात आलेल्या व्यक्तींच्या व स्थळाच्या नावांची सूची दिलेली असते. ही सूची अनुक्रमणिकेपेक्षांही फार उपयुक्त व महत्त्वाची असते.

समजा, एखादा वाचक कुस्ती या विषयावरचे एखादे पुस्तक वाचीत आहे. अर्थातच त्या पुस्तकात गामा, व्यंकप्पा, दारासिंग वगैरे अनेक पेहलवानाची व त्यानी मारलेल्या अनेक ठिकाणच्या कुस्त्याची माहिती अनेक पानावर विखुरलेली असू शकेल. पुस्तकाच्या शेवटी दिलेल्या सूचीत या प्रत्येक पेहलवानाचे नाव दिलेले असेल व त्यापुढे त्याची माहिती कुठकुठल्या पानांवर आलेली आहे त्या पानाचे क्रमांक दिलेले असतील. तसेच त्यानी जिथे कुस्त्या मारल्या असतील त्या स्थळाची नावे व पानाचे अनुक्रमही त्या सूचीत दिलेली असतील. ही पाने उलगडून आपण पाहिले की त्यापैकी आपणास हव्या त्या एका पेहलवानाबद्दल निरनिराळी माहिती मिळू शकते. ती उतरून घेऊन आपण त्या एका पेहलवानाबद्दल एकत्र अशी सर्व माहिती गोळा करू शकतो. ही सूची स्थळाच्या किंवा व्यक्तींच्या नावाच्या वर्णानुक्रमाने तयार करण्यात येत असल्याने ही माहिती शोधून काढणे कुणालाही सहजशक्य असते.

## २

माझ्या लहानपणी पुस्तके जशी क्वचितच आमच्या हाती पडत, तशीच वाचनालये किंवा ग्रंथालयेही फारशी आमच्या आटोक्यात नसत. शाळेत ग्रंथालय बहुधा नसायचेच! असले तरी त्याची दादही मुलांना नसायची! पुस्तके सगळी कडी-कुलुपांत! थोड्या दिवसांपूर्वी सेतु माधवराव पगडी यांना मी त्यांच्या लहानपणच्या वाचनाबद्दल आठवणी विचारल्या तेव्हा ते म्हणाले होते, 'पुण्यास मी शिक्षणासाठी आल्यावर ज्या शाळेत दाखल झालो, त्या शाळेत विद्यार्थ्यांसाठी ग्रंथालय आहे हे कुणी मला परिक्षेपर्यंत सांगितलेच नाही; आणि अशा रीतीने वर्षभर वाचन करण्याची चांगली संधी माझ्या हातातून निसटली. हातातून निसटलेल्या त्या संधीची अजूनही मला हळहळ वाटत असते.'

आता शाळाशाळांतून, विद्यालयांतून आणि नाक्या-नाक्यावरून ग्रंथालये आपल्या सेवेसाठी हजर असल्याचे दिसते. ग्रंथालयातून वाचक आणि ग्रंथ यांमधील पूर्वीचे आडपडदेही आता दूर झालेले आहेत. मी पूर्वी जेव्हा सार्वजनिक वाचनालयात जात असे, तेव्हा तेथील सर्व पुस्तके मला उंच उंच भक्कम कपाटांतून दीनवाणेपणाने बंद केलेली आढळत. कपाटाच्या काचेतूनच मी त्यांची मोहक, सुंदर, सोनेरी नावे वाचीत असे. एखादे नाव जर मला आवडले तर ते पुस्तक घेऊन, उघडून बघण्याची काही सोय नसे. ग्रंथालयाचा शिपाई कुठे तरी कोपऱ्यात डुलकी घेत बसलेला असे. त्याला मोठ्या अजीजीने बोलावून आणून ते पुस्तक काढून घ्यावे आणि चाळून पाहावे, तर असायचे भलतेच. ओशाळल्यागत होऊन ते परत ठेवावे तर तो शिपाई असा अंगावर खेकसायचा, की नको ते पुस्तक वाचायला असे होऊन जायचे.

तेथून दुसऱ्या कपाटाकडे जाऊन यातील हे पुस्तक द्या असे त्या शिपायाला पुन्हा सांगण्याची मग हिम्मतच होत नसे.

आता ग्रंथालयातील कुठल्याही ग्रंथापर्यंत तुमचे हात सहज पोचू शकतात. कारण चांगल्या ग्रंथालयातून पुस्तके आता कडी-कुलपात ठेवली जात नाहीत. ती उघड्या मांडणीवर ओळीने लावून ठेवलेली असतात. तुम्ही मांडणीसमोर उभे राहून पुस्तके न्याहाळता, एखादे तुम्हाला आवडले तर ते काढून घेऊ शकता, चाळून पाहून ठीक न वाटल्यास, पुन्हा जागेवर ठेवू शकता, अगदी मौज आहे तुमची !

ग्रंथालयातून पुस्तके मांडणीवर कशी मांडली जातात हे एकदा समजावून घ्यायला पाहिजे तुम्ही पुढल्या वेळी आपल्या ग्रंथालयात जाल तेव्हा मुद्दाम बारकाईने पाहा मांडणीवरील ही पुस्तके थोडीशी सैल-सैल अशी उभी केलेली दिसतील ग्रंथालयाचा सेवक मांडणीवरील दोन पुस्तके आपल्या डाव्या हाताने किंचित दूर करील व तुम्ही परत आण लेले पुस्तक, त्याच्यामधे उभे करील मात्र त्या पुस्तकाची जागा तिथेच असली पाहिजे बरे ! वाटेल त्या मांडणीवरील पुस्तक वाटेल त्या दुसऱ्या मांडणीवर ठेवता येत नाही पण आपण त्याबद्दल नंतर बाढू ! आता फक्त पुस्तक मांडणीवर कसे ठेवले जाते तेवढेच बघू या. पुस्तकाच्या रांगेत जर एखादे पुस्तक शिरत नसले तर सेवक ते जोराने खुपसून आत घालणार नाही. सर्व पुस्तके तो हालवतो, व जादा होणारे कोपऱ्यातील पुस्तक काढून, खालच्या फळीवरील पुस्तकांच्या रांगेत पहिल्या नंबरावर उभे करतो. पुस्तके लावताना त्याला नेहमी असा थोडाफार जागा पालट करावा लागतो. कारण रोज नव्या-नव्या पुस्तकांची ग्रंथालयात भर पडतच असते, आणि नव्या पुस्तकांना योग्य ठिकाणी जागा करून द्यावीच लागते.

एखादे पुस्तक तुम्हाला हवेसे वाटले तरी ते कपाटातून खसकन् बाहेर ओढू नये आगऱ्याजवळचे पहिले बोट, किंवा पुस्तक मोठे व जाड असल्यास दोन बोटे त्याच्या वरच्या बाजूने आत घाला. तुमच्या बोटाचा जोर सहसा पुस्तकाच्या कण्यावर येणार नाही याबद्दल काळजी घ्या. बोटे पुस्तकावर दाबा व पुस्तक हळूच आपल्याकडे ओढा पुस्तकाचा माथा (वरचा भाग) प्रथम त्या रांगेतून बाहेर येईल बाहेर येणारा पुस्तकाचा तो कोपरा पकडा व मग पुस्तक बाहेर ओढून घ्या. पण यावेळी सुद्धा पुस्तकाचा कणा पकडू नका. पुस्तकाचे अगच हातात धरा.

तुम्ही आपल्या शाळेच्या अगर सार्वजनिक अगर इतर कुठल्याही ग्रंथालयात गेलात, तरी तिथे तुम्हाला मुख्यत. दोन प्रकारची पुस्तके आढळून येतील. एक प्रकार कल्पित कथा, कादंबऱ्या, नाटके वगैरेंचा आणि दुसरा प्रकार सत्य घटना सांगणाऱ्या चरित्रे, आत्मचरित्रे, इतिहास, शास्त्रे, प्रवास, तत्त्वज्ञान वगैरेंसारख्या इतर विषयावरील पुस्तकांचा.

तुमच्या ग्रंथालयातील पुस्तकांची संख्या शेकडो, नव्हे हजारोंनी असणार. या हजारो पुस्तकातून आपणास हवे असलेले एखादे पुस्तक दर वेळी शोधून काढायचे म्हणजे मोठे जिकिरीचेच काम व्हायचे! आणि त्यासाठी वेळही कितीतरी मोडावा लागेल. हे काम वाचकासाठी अगदी सोपे व्हावे म्हणून पुस्तके काही विशिष्ट पद्धतीने कपाटातून अगर मांडणीवर उभी करून ठेवण्यात येतात. ही पुस्तके क्रमवारीने कशी मांडली जातात हे समजावून घेणे अतिशय उपयुक्त ठरते. ग्रंथालयातील पुस्तकांची निवड करणे, ती खरेदी करणे, व्यवस्थित लावणे, देणे-घेणे वगैरे सर्वच कामाची व्यवस्था ग्रंथपालाकडे असते. तुम्हाला काही माहिती हवी असल्यास, तुमच्या काही अडचणी असल्यास ग्रंथपाल त्याबाबत तुम्हाला साहाय्य देतात

अवलंबिलेली दिसून येते, तर काही ग्रथाल्यातून ड्युईच्या दशांश पद्धतीचा वापर करण्यात येतो. ग्रंथाल्यातील ग्रंथाची विभागणी साधारणत तत्त्वज्ञान, धर्म, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, शास्त्रे, उद्योगधंदे, कला, वाङ्मय, इतिहास, सामान्य प्रश्न अशा तऱ्हेने निरनिराळ्या विषयानुसार केलेली असते. या विभागाचे निदर्शक असे अनुक्रम नंबर अगर अक्षरे पुस्तकाच्या कण्यावरील चिठ्ठीवर नमूद करण्यात येतात. शिवाय या प्रत्येक विभागाचे पोटविभाग व त्यांचे उपविभाग पाडण्यात येऊन अनेक सूक्ष्म विभागही दाखवण्यात आलेले असतात.

ग्रंथाल्यात पुस्तकाची जी तालिका (कॅटलॉग) ठेवण्यात आलेली असते, त्या तालिकेत या विभागाचे किंवा विषयाचे अंक नमूद केलेले असल्यामुळे पुस्तकाच्या नावावरून किंवा विषयानुरूप हे अंक पाहता वरून त्याची मांडणीवरील जागा वाचकाला शोधून काढणे सहज शक्य असते.

विषयवारीने केलेले पुस्तकाचे वर्गीकरण सुरुवातीस नवीन वाचकाला मोठे गुतागुतीचे वाटते व तो भांबावून जातो हे खरं ! पण हळूहळू सरावाने त्याच्या लक्षात येऊ लागते की एकाच वर्गातील सर्व पुस्तके एकाच आकड्याने किंवा अक्षराने निर्देशित करण्यात आलेली आहेत, आणि ती सर्व क्रमाने एकापुढे एक अशी मांडणीवर लावलेली आहेत तसेच एकेका विषयाचे पोट भाग पाडून त्याचेही पुन्हा अनेक उपविभाग केलेले आहेत

पुष्कळशा ग्रथाल्यातून ड्युईच्या दशांश पद्धतीप्रमाणे पुस्तकाचे वर्गीकरण करण्यात येत असते या पद्धतीत पुढे दिल्याप्रमाणे पुस्तकाचे विभाग पाडण्यात येतात.

००० — सर्वसामान्य विषय
१०० — तत्त्वज्ञान
२०० — धार्मिक ग्रंथ
३०० — समाजशास्त्र
४०० — भाषाशास्त्र
५०० — शास्त्रीय विषय
६०० — तांत्रिक विषय, उपयुक्त कला
७०० — कला
८०० — वाङ्मय
९०० — इतिहास

यापैकी प्रत्येक विभागाचे आणखी नऊ उपविभाग व त्यांचेही प्रत्येकी आणखी उपविभाग पाडण्यात आलेले आहेत. उदाहरणार्थ ९०० हा क्रमांक इतिहास विभागाचा आहे. त्यापुढे ९०१ ते ९०९ इतिहासांतर्गत अनेक विषय व नंतर ९१० हा इतिहासातच मोडणाऱ्या भूगोल व प्रवास या विषयाचा क्रमांक येईल. ९११ ते ९१९ पर्यंतच्या क्रमांकात भूगोल व प्रवासांतर्गत अनेक विषयावरील पुस्तके समाविष्ट होतील व नंतर ९२० हा क्रमांकाचा वर्ग येईल ९२० म्हणजे चरित्रे

ज्या वाचकाला थोरामोठ्यांची चरित्रे वाचायची असतील त्याने कपाटातील ९२ किंवा ९२० क्रमांकाखालची पुस्तके बघावीत तिथे सर्व चरित्र-ग्रंथ एकापुढे एक क्रमाने लावून ठेवलेले त्याला आढळतील. तथापि चरित्रे मांडण्याच्या बाबतीत ग्रंथपाल दुसरी एक प्रथा पाळीत असतात. ती म्हणजे चरित्र ग्रंथ हे ग्रंथकाराच्या नावाच्या अनुक्रमाप्रमाणे न लावता, ते चरित्र नायकाच्या नावाच्या अनुक्रमाप्रमाणे लावण्यात येतात. यामुळे एखाद्या थोर पुरुषाची लिहिली गेलेली सगळी चरित्रे,

अवलंबिलेली दिसून येते, तर काही ग्रंथालयातून ड्युईच्या दशांश पद्धतीचा वापर करण्यात येतो. ग्रंथालयातील ग्रंथाची विभागणी साधारणत तत्त्वज्ञान, धर्म, समाजशास्त्र, भाषाशास्त्र, शास्त्रे, उद्योगधंदे, कला, वाङ्मय, इतिहास, सामान्य प्रश्न अशा तऱ्हेने निरनिराळ्या विषयानुसार केलेली असते या विभागाचे निदर्शक असे अनुक्रम नंबर अगर अक्षरे पुस्तकाच्या कण्यावरील चिठ्ठीवर नमूद करण्यात येतात. शिवाय या प्रत्येक विभागाचे पोटविभाग व त्याचे उपविभाग पाडण्यात येऊन अनेक सूक्ष्म विभागही दाखवण्यात आलेले असतात.

ग्रंथालयात पुस्तकाची जी तालिका (कॅटलॉग) ठेवण्यात आलेली असते, त्या तालिकेत या विभागाचे किंवा विषयाचे अंक नमूद केलेले असल्यामुळे पुस्तकाच्या नावावरून किंवा विषयानुरूप हे अंक पडताळून त्याची मांडणीवरील जागा वाचकाला शोधून काढणे सहज शक्य असते.

विषयवारीने केलेले पुस्तकाचे वर्गीकरण सुरुवातीस नवीन वाचकाला मोठे गुंतागुंतीचे वाटते व तो भांबावून जातो हे खरे! पण हळूहळू सरावाने त्याच्या लक्षात येऊ लागते की एकाच वर्गातील सर्व पुस्तके एकाच आकड्याने किंवा अक्षराने निर्देशित करण्यात आलेली आहेत, आणि ती सर्व क्रमाने एकापुढे एक अशी मांडणीवर लावलेली आहेत तसेच एकेका विषयाचे पोट भाग पाडून त्याचेही पुढे अनेक उपविभाग केलेले आहेत.

पुष्कळशा ग्रंथालयातून ड्युईच्या दशांश पद्धतीप्रमाणे पुस्तकाचे वर्गीकरण करण्यात येत असते या पद्धतीत पुढे दिल्याप्रमाणे पुस्तकाचे विभाग पाडण्यात येतात.

००० — सर्वसामान्य विषय
१०० — तत्त्वज्ञान
२०० — धार्मिक ग्रंथ
३०० — समाजशास्त्र
४०० — भाषाशास्त्र
५०० — शास्त्रीय विषय
६०० — तांत्रिक विषय, उपयुक्त कला
७०० — कला
८०० — वाङ्मय
९०० — इतिहास

यापैकी प्रत्येक विभागाचे आणखी नऊ उपविभाग व त्यांचेही प्रत्येकी आणखी उपविभाग पाडण्यात आलेले आहेत. उदाहरणार्थ ९०० हा क्रमांक इतिहास विभागाचा आहे. त्यापुढे ९०१ ते ९०९ इतिहासांतर्गत अनेक विषय व नंतर ९१० हा इतिहासातच मोडणाऱ्या भूगोल व प्रवास या विषयांचा क्रमांक येईल. ९११ ते ९१९ पर्यंतच्या क्रमांकात भूगोल व प्रवासांतर्गत अनेक विषयांवरील पुस्तकें समाविष्ट होतील व नंतर ९२० ह्या क्रमांकाचा वर्ग येईल. ९२० म्हणजे चरित्रे.

ज्या वाचकाला थोरामोठ्यांची चरित्रे वाचायची असतील त्याने कपाटातील ९२ किंवा ९२० क्रमांकाखालची पुस्तकं बघावीत. तिथे सर्व चरित्र-ग्रंथ एकापुढे एक क्रमाने लावून ठेवलेले त्याला आढळतील. तथापि चरित्रे मांडण्याच्या बाबतीत ग्रंथपाल दुसरी एक प्रथा पाळीत असतात. ती म्हणजे चरित्र ग्रंथ हे ग्रंथकाराच्या नावाच्या अनुक्रमाप्रमाणे न लावता, ते चरित्र-नायकाच्या नावाच्या अनुक्रमाप्रमाणे लावण्यात येतात. यामुळे एखाद्या थोर पुरुषाची लिहिली गेलेली सगळी चरित्रे,

ग्रंथालयात नवीन पुस्तके आली की ग्रंथपाल प्रथम ती पाहून, तपासून त्याची वर्गवारी ठरवितात म्हणजे ती वर सांगितलेल्या दोन प्रकारापैकी कुठल्या प्रकारात बसतात हे ते पाहतात. कथा, कादम्बऱ्या, नाटकं ही पुस्तके 'कल्पित' विभागात मोडतात, हे वर म्हटलेच आहे. या पुस्तका तील सर्व व्यक्ती व स्थळे, तशाच घटना काल्पनिक असून, लेखकांनी त्या केवळ कल्पनेने शोधून काढलेल्या असतात यातील माणसे आणि घटना, जरी कधी कधी खऱ्या माणसावरून घतल्यासारख्या वाटल्या तरी लेखकांनी, त्याना तिखटमीठ लावून खास सजविलेल्या असतात त्या माणसाचे आपसातील वागणे, बोलणे चालणे, समापणे, देवघेव सगळे सगळे काही लेखकाच्या कल्पनेतून निघालेल असते

कथा कादबऱ्याची ही पुस्तके, ग्रंथपाल कपाटात अगर पुस्तकाच्या माडणीवर लावतात, ती त्याच्या लेखकाच्या नावाच्या अनुक्रमाने म्हणजे शाळेच्या हजेरीपटावर मुलाची जशी अनुक्रमाने नावे घातली जातात तशी। लेखकाचे म्हणजेच ग्रंथकाराचे आडनाव प्रथम व त्याच्या नावाची आद्याक्षरे नतर अशा तऱ्हेने पुस्तकाचा क्रम लावला जातो सोपे करून सांगायचे म्हणजे अभ्यकर, आरेकर, उझाळ, करडे, कामत, खोनरेकर गोखले, अशा चढत्या क्रमाने पुस्तके लावली जातात एकाच नावाचे दोन लेखक असले तर त्याच्या नावातील आद्याक्षराचा विचार करून क्रम लावावा लागतो उदाहरणार्थ करदीकर अनत वामन हे एक ग्रंथकार आहेत आणि करदीकर यशवत पाडुरग हे दुसरे लेखक आहेत. या दोघाची पुस्तके कपाटात लावताना ग्रंथपाल प्रथम करदीकर अनत वामन याची पुस्तके लावील व त्यानतर यशवत पाडुरग याची पुस्तके ठेवील.

पुस्तकाच्या कण्यावर खालच्या बाजूस चौकोनी आकाराची छोटीशी पाढऱ्या कागदाची चिठ्ठी ग्रंथपाल चिकटवीत असतात त्या चिठ्ठीवर

पुस्तक ज्या वर्गातील असेल तो वर्ग दाखवणारा आकडा अगर अक्षर लिहिलेले असते, व त्या खाली रेघ मारून पुस्तकाच्या नावातील दोन किंवा तीन आद्याक्षरे आणि त्यापुढे उभी रेघ मारून लेखकाच्या नावातील दोन किंवा तीन अक्षरे लिहिण्यात येतात. कधी कधी नंबराखाली केवळ लेखकाच्याच नावाची अक्षरे त्रोटकपणे देण्यात येतात. उदाहरणार्थ,

$\frac{\text{द ३१}}{\text{खाडे वि}}$ (खाडेकराची कादंबरी)

एखाद्या छापील पुस्तकातील ओळी व त्या ओळींतील शब्द यांची जशी रचना व मांडणी केलेली असते त्याप्रमाणेच ग्रंथपाल आपल्या ग्रंथालयातील पुस्तकांची मांडणी कपाटातून करीत असतात कपाटात डाव्या बाजूकडून पुस्तके मांडण्यास सुरवात करून ती उजव्या कोपऱ्यापर्यंत मांडीत न्यायची, मग पुन्हा खालच्या फळीवरील डाव्या बाजूकडून उजव्या बाजूकडे पुस्तके लावीत न्यायची

ही झाली कथा कादंबऱ्यांची गोष्ट! आता इतर विषयावरील पुस्तकांची मांडणी ग्रंथपाल कशी करतात ते पाहिले पाहिजे. कपाटातून पुस्तके लावताना ग्रंथपाल नेहमी एक काळजी घेत असतात ती अशी की एकाच विषयावरची सर्व पुस्तके एकाच ठिकाणी क्रमाने मांडली जावीत ही होय म्हणजे पावसाबद्दल ग्रंथालयात असतील तीं सगळी पुस्तके किंवा शेतीबद्दल असतील तेवढी पुस्तके एकापुढे एक अशा क्रमाने मांडली जावीत ग्रंथपाल दरेक पुस्तक पाहून त्यातील विषयाचे बारकाईने निरीक्षण करतात आणि ग्रंथालय शास्त्रात त्या विषयाला दिलेला अनुक्रम अंक किंवा अक्षर त्यावर नमूद करतात

पुस्तकांची अशी वर्गवारी करण्याच्या पद्धती अनेक आहेत आपल्याकडे डॉ. रंगनाथन यांची द्विबिंदु वर्गीकरण पद्धती काही ग्रंथालयातून

एकापुढ एक माडली जातात  गाधीजींची सगळी चरित्रे, टिळकाचे सगळे चरित्र ग्रथ किंवा  नेहरूचे  सगळे चरित्र-ग्रथ या पद्धतीमुळे वाचकाना एकाच कपाटात एकाच ठिकाणी क्रमाने माडलेले दिसतील व त्यातील पसत वाटेल तो त निवडून घऊ शकतील

पुस्तकाचा ' मागणी नंबर ' असे. अर्थातच त्या नंबराचे पुस्तक नक्की कुठे आहे ते तेथील ग्रंथपालाला किंवा शिपायालाच ठाऊक असायचे. अगोदर त्या लठ्ठ चोपड्यातून पुस्तकाची नावे शोधून काढणे माठे कटकटींचे काम असे ते शोधून काढल्यास, नंतर कपाटातून ते पुस्तक शोधून काढणे त्याहूनही कठीण असायचे त्यासाठी ग्रंथालयाच्या शिपायाची अजीजी करायची, तो वसकन् अंगावर यायचा

आता तुमच्या पुस्तकाचा क्रमांक तुम्हीच शोधून काढता, त्याची कपाटातील किंवा मांडणीवरील ठराविक जागा, क्रमांकानुसार तुम्हाला ठाऊक असते कपाटावरून कधी कधी ००० ते ०९९ किंवा १००ते १०९ असे क्रमांक दाखवणारे आकडे घातलेले असतात तिथे जाऊन तुम्हाला हवं असलेले पुस्तक तुम्ही आपल्या हाताने काढून घेता मात्र पुस्तक उचलताना ते नीट काळजीपूर्वक तपासून घेत चला पुस्तकाचा केवळ क्रमांक पाहून तुम्ही पुस्तक उचललेत, तर ते दुसरेच एखादे पुस्तक असण्याचाही संभव असतो एकाच विषयावर अनेक लेखकांनी लिहिलेली बहुविध पुस्तके असू शकतात व त्यांचा विषय एकच असल्या मुळे, वर्गीकरण केल्यानंतर एकच क्रमांक त्यांना मिळण्याचा संभव असतो तेव्हा नुसता क्रमांक पाहून भागणार नाही, तर लागलीच पुस्त-काचा मथळा वाचून पाहा, किंवा क्रमांकाखाली दिलेली लेखकाच्या नावाची आद्याक्षरे पाहा, आणि आपणास हवं असलेले पुस्तक ते हेच, ही खात्री करून ते घ्या

तुमच्या ग्रंथालयात आता पुस्तकाच्या ज्या याद्या असतात, त्या लठ्ठ पुस्तकातून केलेल्या नसतात त्यांची रचना व तंत्रच आता पार बदलून गेलेले आहे आता ग्रंथालयातून पुस्तकाच्या ज्या याद्या असतात त्यांना तालिका म्हणतात त्या याद्या किंवा तालिका कार्ड पद्धतीच्या असतात.

म्हणजे ग्रंथालयात असलेल्या प्रत्येक पुस्तकाच्या नावाचे एकेक कार्ड तयार करून अशी सगळी कार्डे किंवा पत्रके वर्णानुक्रमाने एकामागे एक लावून ती त्याच आकाराच्या खणातून ठेवली जातात व हे सगळे खण एका मोठ्या कपाटात, खाली दाखवलेल्या आकृतीप्रमाणे एका खाली एक बसवले जातात.

| १<br>अ – ई | ४<br>घ – झ | ७<br>त – न | १०<br>य – व |
|---|---|---|---|
| २<br>ई – अं | ५<br>झ – ड | ८<br>न – भ | ११<br>व – स |
| ३<br>अं – घ | ६<br>ड – त | ९<br>म – य | १२<br>स – ज्ञ |

ग्रंथालयातील प्रत्येक पुस्तकाच्या नावे तीन तऱ्हेने पत्रके (कार्ड) तयार केली जातात. एक कार्ड लेखकाच्या नावाप्रमाणे, दुसरे ग्रंथाच्या नावाप्रमाणे व तिसरे पुस्तकातील विषयानुसार. म्हणजे थोडक्यात असे, की एका पुस्तकाची नोंद तीन ठिकाणी होऊन, ती तीन कार्डे तीन निरनिराळ्या कपाटातील खणात जाऊन बसतात.

तालिकेसाठी जी कार्डे बनविण्यात येतात, त्यावर, त्या पुस्तकाबाबत कमीतकमी खाली दिलेली माहिती असतेच. (१) पुस्तकाच्या वर्गीकरणाचा क्रमांक, (२) ग्रंथकाराचे नाव, प्रथम आडनाव व नंतर त्याचे आद्य नाव व वडिलांचे नाव, (३) पुस्तकाचे नाव, (४) प्रकाशकाचे नाव व प्रकाशनाच्या तारखेची नोंद आणि शेवटी पुस्तक ज्या क्रमाने दाखल करून घेण्यात आले तो क्रमांक.

तालिकेतील कार्ड कसे तयार केले जाते व त्यातील माहितीची नोंद कशी केलेली असते, त्याचा नमुना खाली दिला आहे.

| ०२७ ८<br>पु.दु. / शिर | शिरधनकर भानू<br>पुस्तकाची दुनिया<br>अभिनव प्रकाशन<br>(१९६७)<br><br>५५४२ |
|---|---|

तालिकेतील ही कार्डे, साधारण पोस्टकार्डाइतकी जाड असतात. ती कार्डे एकसारखी हाताळली जाऊन मागेपुढे ढकलली जात असल्यामुळे पातळ असून चालत नाही. साधारण ३ इंच रुंद व ५ इंच लांब अशा आकाराची ती असतात. कार्डाच्या वरच्या कडेजवळ डाव्या बाजूला जो वर्ग निर्देशाक दिलेला असतो त्याचे महत्त्व मोठेच असते. त्यावरून ते पुस्तक कपाटात कुठे लावलेले असेल त्या जागेची आपणास कल्पना येऊ शकते. कार्डाच्या खालच्या बाजूला उजवीकडे जो आकडा दिलेला आहे तो वाचकाच्या दृष्टीने महत्त्वाचा नाही त्याचे महत्त्व फक्त ग्रंथपालानाच असते. पुस्तक ग्रंथालयात केव्हा दाखल झाले याची ती नोंद असते.

ग्रंथकाराच्या नावाची तयार केलेली अशी कार्डे तालिकेच्या कपाटातील खणातून, वर्णानुक्रमाने पुढून पाठीमागे अशी ओळीने उभी ठेवलेली असतात. कपाटातील हे खण कसे असतात ते वरील आकृतीत दाखवलेच आहेत. या कार्डावरून ग्रंथालयात कुठकुठल्या ग्रंथकाराची पुस्तके उपलब्ध आहेत हे कळून येते. आणि आपणास हवे असलेले एखादे पुस्तक

शोधून काढण्यात लागणारा वेळ या पद्धतीमुळे वाचतो. ज्या ग्रंथकाराचे पुस्तक आपणास हवे असेल त्या ग्रंथकाराचे नाव या तालिकेत बघायचे. त्याच्या सर्व ग्रंथांची कार्डे तेथे एकामागे एक लावून ठेवलेली असतात. त्या कार्डावरील डाव्या कोपऱ्यातील मागणी नंबर (कॉल नंबर) बघायचा व त्याच्या ठराविक जागेवरून ते पुस्तक काढून घ्यायचे

ग्रंथकाराच्या नावाप्रमाणेच पुस्तकाच्या नावानुक्रमाने कार्डे तयार करून त्याच्याही तालिका वरीलप्रमाणेच वाचकांच्या सोयीसाठी ठेवलेल्या असतात. ज्या वाचकाला पुस्तकाचे नाव माहीत असल पण ग्रंथकाराचे नसेल, त्याने त्या तालिकेवरून आपणास हव्या असलेल्या पुस्तकाचा मागणीक्रमांक म्हणजेच कपाटातील त्याचे स्थान शोधून काढावे. या कार्डाचा नमुना खाली दिलेला आहे.

| ०२७ ८<br>पु. दु. / शिर | पुस्तकाची दुनिया<br>शिरधनकर भानू<br>अभिनव प्रकाशन<br>(१९६७) |
|---|---|

या दोन उपयुक्त तालिकांशिवाय, आणखी एक तालिका ग्रंथालयात ठेवलेली असते. ही तालिका विषयवारीने केलेली असते. या तालिकेवरून वाचकांना अमुक एका विषयावर ग्रंथालयात कुठले ग्रंथ उपलब्ध आहेत याची कल्पना येते. समजा, तुम्हाला चित्रकलेवरील एखादे पुस्तक हवे आहे. तर ग्रंथालयातील या तिसऱ्या प्रकारच्या तालिकेकडे तुम्ही

जा. त्यातील ललितकला या विषयावरील कार्डांचा खण काढा. त्यांत ७४० या क्रमांकाखाली चित्रकलेवरील पुस्तकांची यादी तुम्हाला सापडेल. त्यावरून तुमच्या गरजेप्रमाणे एखादे दुसरे पुस्तक तुम्ही निवडू शकाल.

तालिकेच्या कपाटातील कार्डांच्या प्रत्येक खणावर किंवा कप्प्यावर बाहेरच्या बाजूस एक चिठ्ठी डकवलेली असते. त्या चिठ्ठीवर त्या कप्प्यात असलेल्या सर्व कार्डांचे क्रमांक किंवा आद्याक्षरे दाखवलेली असतात. जसे अ ते ई किंवा २०० ते ३१९. समजा तुम्हाला अण्णेगिरी नावाच्या एका लेखकाचे पुस्तक हवे आहे, तर ग्रंथकाराच्या नावाच्या तालिकेच्या कपाटात 'अ' ते 'ई' हा कप्पा उघडा. तुम्हाला ते नाव त्यात सापडेल. या सोयीमुळे आपणास हव्या असलेल्या ग्रंथकाराचे किंवा पुस्तकाचे नाव नेमक्या कुठल्या खणात असेल हे वाचकाच्या चटकन लक्षात येते व त्याचा वेळ मोडत नाही.

तालिकेतील कपाटात ज्या अनुक्रमाने कार्डे लावलेली असतात, त्याच अनुक्रमाने ती ती पुस्तके कपाटातून अगर मांडणीवर ठेवलेली असल्यामुळे आणि त्या कपाटावरही तसेच अनुक्रम दाखवणाऱ्या चिठ्ठ्या लावलेल्या असल्यामुळे हवे असलेले पुस्तक ग्रंथपालाच्या साहाय्याशिवाय शोधून काढणे वाचकाला अगदी सहज सुलभ असते

## ४

ग्रंथालयात जाऊन आपणास हवे असलेले विवक्षित पुस्तक शोधून कसे काढायचे किंवा त्यासाठी तालिकेचा कसा उपयोग करायचा, हे आपणास आता ठाऊक झाले. पण आपणास एखाद्या विषयावरचे अमुक

एक पुस्तक वाचणे आवश्यक आहे किंवा हवे आहे हे त्या अगोदर नक्की केलेले असावे

आणि पुस्तकाची निवड करण्याचे हे काम काही वाटते तितके सोपे नसते

तथापि पुस्तके निवडण्याचे हे काम,ग्रंथपालानी आपल्यासाठी अगोदरच केलेले असते, हेही खरेच ! कारण त्यानी ग्रंथालयात संग्रहित केलेली दरेक विषयावरची पुस्तके अगदी निवडक व वाचकाना उपयुक्त होतील अशीच मुद्दाम निवडलेली असतात ग्रंथालयातच का? पुस्तकाच्या दुकानात गेलात तरी तिथेही हेच तंत्र अमलात आणलेले तुम्हाला दिसून येईल दुकानात शेकडो, नव्हे, हजारो पुस्तके विक्रीसाठी आलेली असतात, पण त्यातील काही थोडी पुस्तके निवडून दुकानदार, ती सर्वांच्या नजरेस चटकन येतील अशा तऱ्हेने समोरच ठेवून ठेवतो येणाऱ्या गिऱ्हाईकाने ती पाहून, त्यातील हवी ती चटकन निवडावी, हा त्याचा उद्देश असतो

तुमचे ग्रंथपाल पुस्तके कशी निवडीत असतील बरे? पुस्तक विक्रेत्य कडून पसंतीसाठी येणारी शेकडो पुस्तके अथपासून इतिपर्यंत वाचून त्यातली चागली चागली पुस्तके निवडून काढणे काही ग्रंथपालाला जमणार नाही त्यासाठी त्याला इतर काही सोप्या मार्गाचाच अवलंब करावा लागेल

पुस्तके प्रसिद्ध करणारे प्रकाशक व पुस्तक विक्रेते कधी कधी आपण नवीन काढलेल्या किंवा त्याच्याकडे विकायला आलेल्या पुस्तकाच्या याद्या नियमितपणे प्रसिद्ध करीत असतात अनेक तऱ्हेच्या वाचकासाठी, आपणाकडे कोणती पुस्तके मिळू शकतील याची थोडक्यात माहिती,

किमती, पृष्ठसंख्या, विद्वानांचे अभिप्राय असलेल्या याद्यांतून दिलेले असतात. या याद्या ते सर्व ग्रंथालयांकडे, तसेच शाळा, विद्यालये, इतर सांस्कृतिक संस्था, व व्यक्तिगत ग्रंथसंग्रह करणारे विद्वान यांच्याकडे नेहमी पाठवीत असतात. ग्रंथपाल असल्या याद्या काळजीपूर्वक वाचून, तपासून पाहतात व आपल्या वाचकवर्गाला उपयुक्त ठरतील अशी पुस्तके त्यांतून निवडून खरेदी करतात. काही प्रकाशक तर खास ग्रंथपालासाठीच अशा याद्या तयार करतात. त्यांत त्यांच्या संग्रही असलेल्या खास जुन्या जुन्या पुस्तकांची माहिती व किमती दिलेल्या असतात.

आजकाल बहुतेक सर्व वृत्तपत्रांतून, पुस्तकांवर अभिप्राय किंवा पुस्तकपरीक्षणे देण्याची प्रथा सर्वमान्य झालेली आहे. वृत्तपत्रांतून येणारी ही पुस्तकपरीक्षणे सर्वांना सहज उपलब्ध असतात. ही परीक्षणे वाचून आपण वाचनासाठी पुस्तके निवडू शकतो. पुस्तकाबद्दल आपली मते ठरवू शकतो. आणि वाचकांना नव्या प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची *माहिती व्हावी, त्यांतून त्यांनी पुस्तके निवडावीत, हा जो वृत्तपत्रांतून व* मासिकांतून पुस्तकपरीक्षणे देण्याचा मूळ हेतू असतो, तो सफल होतो.

वृत्तपत्रांतील परीक्षणे बहुधा त्या त्या विषयातील तज्ज्ञाकडून लिहून घेतलेली असल्यामुळे वाचकांना त्यावरून पुस्तकाच्या स्वरूपाची थोडी-फार कल्पना येते. पुस्तकाच्या परीक्षकाने, परीक्षण करताना ग्रंथकर्त्यांचे नाव, पुस्तकाचे नाव, प्रकाशनसंस्था, पृष्ठसंख्या, चित्रांकित आहे की नाही वगैरे माहिती दिलेलीच असते. पण त्याहीपेक्षा पुस्तकाचे एकंदर स्वरूप व महत्त्व, तसेच लेखकाची विषय हाताळण्याची पात्रता व कौशल्य व एकंदरीत पुस्तक कसे व कितपत वाचनीय आहे याबद्दल माहिती तो देत असल्यामुळे त्या पुस्तकाची बरीचशी कल्पना आपणास येऊ शकते. या माहितीवरून आपणास कुठले पुस्तक उपयुक्त होईल ते

एक पुस्तक वाचणे आवश्यक आहे किंवा हवे आहे हे त्या अगोदर नक्की केलेले असावे.

आणि पुस्तकाची निवड करण्याचे हे काम काही वाटते तितके सोपे नसते.

तथापि पुस्तके निवडण्याचे हे काम, ग्रंथपालांनी आपल्यासाठी अगोदरच केलेले असते, हेही खरेच ! कारण त्यांनी ग्रंथालयात संग्रहित केलेली दरेक विषयावरची पुस्तके अगदी निवडक व वाचकांना उपयुक्त होतील अशीच मुळी निवडलेली असतात. ग्रंथालयातच का ? पुस्तकाच्या दुकानात गेलात तरी तिथेही हेच तंत्र अमलात आणलेले तुम्हाला दिसून येईल. दुकानात शेकडो, नव्हे, हजारो पुस्तके विक्रीसाठी आलेली असतात, पण त्यातील काही थोडी पुस्तके निवडून दुकानदार, ती सर्वांच्या नजरेस चटकन येतील अशा तऱ्हेने समोरच लावून ठेवतो. येणाऱ्या गिऱ्हाईकाने ती पाहून, त्यांतील हवी ती चटकन निवडावी, हा त्याचा उद्देश असतो.

तुमचे ग्रंथपाल पुस्तके कशी निवडीत असतील बरे ? पुस्तक विक्रेत्याकडून पसतीसाठी येणारी शेकडो पुस्तके अथपासून इतिपर्यंत वाचून त्यातली चांगली चांगली पुस्तके निवडून काढणे काही ग्रंथपालाला जमणार नाही. त्यासाठी त्याला इतर काही सोप्या मार्गांचाच अवलंब करावा लागेल.

पुस्तके प्रसिद्ध करणारे प्रकाशक व पुस्तक विक्रेते कधी कधी, आपण नवीन काढलेल्या किंवा त्यांच्याकडे विक्रीला आलेल्या पुस्तकांच्या याद्या नियमितपणे प्रसिद्ध करीत असतात. अनेक तऱ्हेच्या वाचकांसाठी, आपणांकडे कोणती पुस्तके मिळू शकतील याची त्रोटक माहिती,

येतात. त्या ठराविक काळात ग्रंथालयात जाऊन कुणीही ती पुस्तके पाहू शकतो, चाळू शकतो, त्याबद्दल आपले मत बनवू शकतो, निवडू शकतो. एखादे पुस्तक आवडल्यास, त्यासाठी लागलीच तो आपली मागणी अग्रहक्काने नोंदून ठेवू शकतो. ही मागणी करण्यासाठी एक लठ्ठ नोंदणी-पुस्तक तिथे ठेवलेले असते. त्यात तो वाचक, पुस्तकाचे नाव, ग्रंथकाराचे नाव, पुस्तकाचा क्रमांक, आपले नाव व आपला सदस्य-क्रमांक नोंदून ठेवतो. त्याची पाळी आली की ते पुस्तक घेऊन जाण्यासाठी ग्रंथालयाकडून त्याला सूचना येते. ठराविक दिवसपर्यंत ते ग्रंथालयात त्याच्यासाठी राखून ठेवण्यात येते. त्या मुदतीत त्याने ते न नेले तर त्याच्या नंतरच्या हक्कदाराला ते देण्यात येते अगर कुणी हक्कदार नसला तर ग्रंथालयातील त्याच्या विशिष्ट जागेवर ते इतर वाचकांसाठी ठेवण्यात येते.

नवीन आलेल्या पुस्तकांची यादीही कधी कधी तयार करून, ग्रंथपाळ ती फलकावर लावतात किंवा कधी कधी पुस्तकाची वेष्टणे काढून तीही फलकावर प्रदर्शित करण्यात येतात. हेतू हा की ग्रंथालयात आलेल्या नव्या ग्रंथांचे वाचकांना आकर्षण वाटावे.

बहुतेक सर्वच पुस्तकांना आता रंगीबेरंगी व सुंदर चित्रे असलेली आकर्षक वेष्टणे घातलेली असतात. या वेष्टणाच्या आकर्षणामुळे वाचक पुस्तक उचलून कधी कधी चाळू लागतो. वेष्टणाच्या आतील दुमडलेल्या भागावर पुष्कळदा त्या ग्रंथकाराच्या इतर पुस्तकांची यादी दिलेली असते. ती वाचकाच्या आयतीच नजरेस येते व त्यातीलही काही पुस्तके मिळवून नंतर त्याला वाचता येतात. ग्रंथकाराप्रमाणेच, त्या प्रकाशकाच्या सुद्धा इतर पुस्तकांची यादी वेष्टणाच्या या आतल्या भागावर छापलेली असते. तीही हौशी वाचकांना उपयुक्त ठरते. तथापि ही यादी म्हणजे एक तऱ्हेने प्रकाशकाची जाहिरातच असते. पुस्तक

ठरवता येऊन, ग्रथालयातून ते मिळवता येते, किंवा आपल्या ग्रंथालयात ते आलेले नसल्यास ते मागवण्याबद्दल सूचना करता येते.

मित्रमंडळीत गप्पागोष्टी करतानासुद्धा, कधी कधी, चांगल्या चांगल्या पुस्तकाची माहिती आपणांस विनायास मिळत असते. एकाने वाचलेले पुस्तक स्वाभाविकच तो दुसऱ्यास शिफारस करीत असतो. या तऱ्हेने अनेक नव्या पुस्तकांची आपणास माहिती मिळू शकते. कधी कधी आपली वडीलधारी माणसे व गुरुजनही त्यांनी वाचलेल्या अनेक जुन्या पुस्तकांची आपल्याजवळ स्तुती करतात व त्याही तऱ्हेने आपणास चागल्या पुस्तकाची माहिती होऊ शकते. माझ्या अगदी लहानपणी मी चक्रवर्ती नेपोलियनचे चरित्र वाचल्याचे मला आठवते. नेपोलियन म्हणजे कोण व त्याचं चरित्र इतक रसभरित असेल अशी त्या लहान वयात मला कल्पनाही आली नसती. पण माझे वडील मला नेहमी म्हणत, 'कसल्या परींच्या गोष्टी वाचतोस? आम्ही लहानपणी नेपोलियनचे चरित्र वाचीत असू. नेपोलियन बोनापार्टचं! तुम्ही ते का वाचत नाही?'

वडिलांचे ते रोजचे बोलणे ऐकून मी नेपोलियनचे चरित्र आमच्या गुरुजींकडून मिळवले व ते वाचताना खरोखरच रगून गेलो. आपल्या गुरुजनांकडून अगर वडीलधाऱ्याकडून मिळणारी ही माहिती खरोखरीच मोलाची असते. कारण जुन्या पुस्तकाबद्दलची माहिती कॅटलॉगातून, नव्या याद्यातून वगैरे मिळणे शक्यच नसते.

आलेली सर्व पुस्तके ग्रथालयात वाचकासाठी दाखल करण्यापूर्वी, ग्रंथपाल ती वाचकाना पाहता यावीत म्हणून प्रथम प्रदर्शित करीत असतात. दर महिन्याच्या पहिल्या, दुसऱ्या आठवड्यात नवी पुस्तके अशी सर्वांना पाहता यावीत म्हणून एखाद्या दालनात मांडून ठेवण्यात

तसतशी तुमची ही नोंद तुम्हांलाच मोठी मनोरंजक वाटेल. आयुष्यभर आपण वाचन करीत आलो, तरी शेवटी आढावा घेऊ लागल्यास, आपण काय वाचले नि त्यापासून काय शिकलो हेच कधी कधी आपले आपणास कळत नाही. गेल्या काही महिन्यांत मी जेव्हा काही विद्वान गृहस्थांना भेटलो आणि त्यांनी आजवर वाचलेल्या पुस्तकांची संख्या वा एकूण पृष्ठसंख्या याबद्दल विचारले, तेव्हा अशी नोंद त्याच्यापैकी कोणी ठेवल्याचे दिसून आले नाही. मात्र अशी नोंद ठेविली असती तर ते नक्कीच हिताचे झाले असते हे मात्र सर्वांचे मत दिसून आले. सेतुमाधवराव पगडी यांनी आपल्या वाचनाबद्दल अशी नोंद ठेविली असल्याचे सांगितले आणि त्या नोंदीवरून, आपण आजवर सुमारे तीन हजार ग्रंथ वाचले असल्याचे ते निश्चितपणे सांगू शकले.

वाचनाची नोंद विस्तृत ठेविली तर अधिकच चांगले. या नोंदवहीत पुढील माहिती तर अवश्य हवी—पुस्तकाचे नाव, ग्रंथकाराचे नाव, पृष्ठसंख्या, वाचून संपविल्याची तारीख व त्रोटक माहिती. त्रोटक माहितीमध्ये पुस्तक वाचून आपणास काय वाटले, काय नवी माहिती मिळाली, त्यापासून काय शिकलो वगैरेची नोंद करणे आवश्यक असते. तुमच्या वाचनाची ही नोंद तुम्हीच पुन्हा पुन्हा वाचलीत, तरी ती तुम्हाला आनंददायी वाटेल. पुस्तकात झालेल्या तुमच्या समरसतेतील क्षण आठवतील, ती वाचताना तुमच्या डोळ्यात तरारलेल्या आसवांची तुम्हाला आठवण येईल. आयुष्यात मागे खर्ची पडलेले ते क्षण काही काळ तरी परत मिळाल्याचा अनुभव येईल. तुमची ही दैनंदिनी किंवा नोंद, वाचनाची आवड असणाऱ्या तुमच्या मित्रानाही उपयुक्त वाटेल. त्यात नोंदलेल्या पुस्तकाबद्दल कुतूहल वाटून तेही ती पुस्तके मिळवून वाचतील. पाहा, सुरुवात तर करा अशी ! !

परीक्षणाप्रमाणे या मार्दाजून पुस्तकाच्या गुणावगुणाची फारशी माहिती आपणास मिळत नाही.

वाचण्यासाठी पुस्तकें निवडावीत कशी, ती ग्रंथालयातून हुडकून कशी काढावीत हे आता आपणास माहीत झाले. आता जी पुस्तकें आपण निवडू ती कशी वाचावीत व त्याचा जास्तीत जास्त उपयोग कसा करून घ्यावा याबद्दल आपण बोलू.

आपण ज्या ग्रंथालयाचे सभासद असतो, ते ग्रंथालय ल्हानसे असले, तरीही त्यात शेकड्यानी पुस्तके असतात. ती सगळीच पुस्तके काही कोणी वाचू शकणार नाही. पण यालासुद्धा काही अपवाद असू शकतात. अगदी तडफेने वाचन करणाऱ्या ( म्हणजेच पुस्तकाचा फडशा पाडणाऱ्या ) अशा एखाद्या वाचकाची गोष्टच निराळी. आचार्य अत्रे यानी लिहिलेल्या आपल्या एका आठवणीचा इथे उल्लेख करावासा वाटतो. ठाण्याच्या तुरुगात असताना त्यानी केलेल्या वाचनाबाबतची ती आठवण होती. ते म्हणतात, ' रात्री आठ वाजता माझी कोठडी बद होत असे आठ वाजल्यापासून अकरा वाजेपर्यंत तीन तास वाचन केल्यावर मग मी झोपी जाई मी झपाट्याने वाचणारा वाचक आहे. तीन चारशे पानाचं पुस्तक मी रात्रीच्या दोन हप्त्यामध्ये सपवू शके. अशा रीतीने मी तीन आठवड्यात तीन हजार पाने तरी वाचून सपविली असतील ' पण म्हणून आपण सर्वचजण काही अत्र्यासारखे तडफने वाचू शकणार नाही पण आपण जे काही थोडेफार वाचन करू शकतो, त्याचा जास्तीत जास्त विनियोग मात्र आपणास खचित करून घेता येईल.

वाचलेल्या सर्व पुस्तकाची नोंद करून ठेवणे या दृष्टीने उपयुक्त होईल. जसजसे दिवस जातील आणि तुमचे वाचन वाढत जाईल,

तसतशी तुमची ही नोंद तुम्हालाच मोठी मनोरंजक वाटेल आयुष्यभर आपण वाचन करीत आलो, तरी शेवटी आढावा घेऊ लागल्यास, आपण काय वाचले नि त्यापासून काय शिकलो हेच कधी कधी आपले आपणास कळत नाही गेल्या काही महिन्यात मी जेव्हा काही विद्वान गृहस्थाना भेटलो आणि त्यानी आजवर वाचलेल्या पुस्तकाची संख्या वा एकूण पृष्ठसंख्या याबद्दल विचारले, तेव्हा अशी नोंद त्याच्यापैकी कोणी ठेवल्याचे दिसून आले नाही मात्र अशी नोंद ठेविली असती तर ते नक्काच हिताच झाले असत हे मात्र सर्वांचे मत दिसून आले सेतुमाधव राव पगडी यानी आपल्या वाचनाबद्दल अशी नोंद ठेविली असल्याचे सांगितले आणि त्या नोंदीवरून, आपण आजवर सुमारे तीन हजार ग्रंथ वाचले असल्याचे ते निश्चितपणे सांगू शकले

वाचनाची नोंद विस्तृत ठेविली तर अधिकच चांगले या नोंदवहीत पुढील माहिती तर अवश्य हवी—पुस्तकाचे नाव, ग्रंथकाराचे नाव, पृष्ठसंख्या, वाचून संपविल्याची तारीख व त्रोटक माहिती त्रोटक माहितीमध्ये पुस्तक वाचून आपणास काय वाटले, काय नवी माहिती मिळाली, त्यापासून काय शिकलो वगैरेची नोंद करणे आवश्यक असते तुमच्या वाचनाची ही नोंद तुम्हीच पुन्हा पुन्हा वाचलात, तरी ती तुम्हाला आनंददायी वाटेल पुस्तकात झालेल्या तुमच्या समरसततील क्षण आठवतील, ती वाचताना तुमच्या डोळ्यात तरारलेल्या आसवांची तुम्हाला आठवण येईल आयुष्यात मागे खर्ची पडलेले ते क्षण काही काळ तरी परत मिळाल्याचा अनुभव येईल तुमची ही दैनंदिनी मित्रा नोंद, वाचनाची आवड असणाऱ्या तुमच्या मित्रानाही उपयुक्त वाटेल त्यात नोंदलेल्या पुस्तकाबद्दल कुतूहल वाटून तेही ती पुस्तके मिळवून वाचतील पाहा, सुरुवात तर करा अशी ! !

वाचलेल्या पुस्तकाची अशी नोंद करणे हिताचे असले तरी केलेल्या वाचनाचा खरा फायदा तुम्हाला घ्यायचा असला, तर टिपणे काढण्याची सवय स्वत ला जडवून घ्यायला पाहिजे. पुस्तके हीच ज्ञान साधनेची सर्वात प्रभावी 'साधने' होत. त्याच्या साहाय्यान कोणालाही अत्यत थोड्या वेळात व सुलभ रीतीने, कुठल्याही विषयाचे ज्ञान सपादन करता येते. ग्रथ परिशीलनाने आपण जे ज्ञान सहजगत्या मिळवू शकतो, तेच सपादन करण्यासाठी, त्या ग्रथकाराला मात्र किती तरी काळ व्यासग करावा व वेळ मोडावा लागला असेल वाचनाच्या नादाने, तुमच्या हाती सहजासहज पडणारा, त्याच्या अभ्यासाचा व ज्ञानाचा हा ठेवा विस्मृतीच्या आड जाऊ नये म्हणून त्यातील उत्तमोत्तम भाग टिपून ठेवणे आवश्यक असते. फुरसतीचे वेळी ती टिपणे पुन्हा पुन्हा वाचून, पूर्वी केलेल्या वाचनाच्या आनदाचा पुन प्रत्यय मिळविणेही यामुळे शक्य होते

केलेल्या या टिपणाचा तुम्हाला व्यवहारात अनन्दा उपयोग होतो. तुम्हालाच स्वत ला पुढेमागे काही लिहावेसे वाटले तर, (हे काही अशक्य आहे असे नाही.) किंवा एखाद्या लहानमोठ्या सभेत तुम्हाला बोलायची पाळी आली (आणि हेही आजकाल मोठेसे अशक्य आहे अस नाही.) तर तुम्ही वेळोवेळी ज्ञानभांडारातून वेचून काढलेल्या आणि टिपून ठेवलेल्या या टिप्पणाचा तुम्हाला केवढा आधार होईल बरे !

मात्र अशा तऱ्हेने एखाद्या विशिष्ट विषयाचा अभ्यास करण्यासाठी म्हणून तुम्ही वाचन करीत असाल व टिपण काढीत असाल तर त्याबाबत सुरवाती पासूनच तुम्हाला काळजी घेतली पाहिजे आपल्या या टिपाटिप्पणी विषय वारीने नोंदल्या पाहिजेत टिपणवहीची पाने विभागून घेतली पाहिजेत व तुमच्या अभ्यासाच्या निरनिराळ्या विषयासाठी ती राखून ठवली

पाहिजेत. त्या त्या विषयावर तुमच्या वाचनात जे जे येईल ते ते त्या विभागात टिपले पाहिजे. थोर लोकांची चरित्रे आपण वाचली तर त्यात त्यांनी केलेल्या वाचनातून अशी टिपणे करण्याची त्यांना सवय होती असे आपणास दिसून येते. नेपोलियनला टिपणे करण्याची व टिपण-पुस्तके ठेवण्याची विलक्षण हौस असे. लष्करी विद्यालयात शिकत असताना इतर विद्यार्थी फुरसतीचा वेळ उनाडण्यात घालवीत असताना, नेपोलियन कोटाचे खिसे इतिहास भूगोलाच्या पुस्तकांनी खचून भरून घेऊन बागेत जाऊन बसे आणि तिथे निसर्गाच्या संगतीत स्वच्छंद वाचन करी आणि टिपणे काढी. बडोद्याचे महाराज सयाजीराव यानाही अशी टिपणे ठेवण्याची सवय होती. त्यांचे जीवन इतके यशस्वी झाले त्याचे कारण त्यांच्या या सवयीतच आढळून येते.

नेपोलियनच्या टिपणाबद्दल वाचल्यानंतरच मी माझी स्वतःची टिपणवही ठेवीत आलो आहे. त्या वहीत पुस्तके, वाचन, वक्तृत्व, प्रवास, चरित्रे, म्हणी वगैरे अनेक विषयावर मी वर्गवारीने टिपणे करीत असतो. माझ्या या प्रस्तुतच्या पुस्तकातील विचार आणि माहिती मी करीत आलेल्या या टिपणाचेच सार होय.

◆ ◆ ◆

शहाणपणाचा नि त्यांच्या शिकवणुकीचा संग्रह नि सार आपणास पुस्तकाशिवाय इतरत्र कुठे सापडत असेल, बरे !

पुस्तकाच्याच साहाय्याने आपल्याला भूतकाळात डोकावता येते, भविष्यकाळात भराऱ्या मारता येतात आणि वर्तमान काळातील सत्य पडताळून पाहता येते. थोरामोठ्यांना न भेटताही पुस्तकाच्या साहाय्याने आपल्याला त्यांच्या सहवासात वावरता येते. फार काय, पुस्तकाच्या साहाय्याने आपण सारी पृथ्वी पालथी घालू शकतो; तिच्या पाठीवरील असंख्य घडामोडींचे ज्ञान मिळवू शकतो. आपल्याला अज्ञात असलेल्या जगाची कवाडे खोलणारी गुरुकिल्ली पुस्तकाशिवाय दुसरी कुठली ?

जोसेफ ॲडिसन याने म्हटले आहे की, 'जगातील सर्व थोर तत्त्ववेत्त्यांनी व विद्वज्जनांनी, मानवजातीच्या कल्याणासाठी जो अमूल्य ठेवा मागे ठेवून दिलेला आहे तो म्हणजे दुसरेतिसरे काही नसून त्यांनी निर्माण केलेली ग्रंथसंपत्तीच होय.' पुस्तकाचे महत्त्व वर्णन करताना ॲडिसनप्रमाणेच इमर्सननेही लिहिले आहे की, 'ज्या ज्या वेळी आपली एखाद्या थोर गृहस्थाशी भेट होते त्या त्या वेळी तो थोर माणूस कोणते ग्रंथ वाचीत असतो हे विचारण्याची संधी कधी दवडू नये. कारण प्रत्येक थोर पुरुषाच्या थोरपणातील काही ना काही हिस्सा त्याने वाचलेल्या पुस्तकांमुळेच त्याला प्राप्त झालेला असतो.'

आणि म्हणूनच, निरनिराळी लहानमोठी माणसे ज्ञानसंपादनाची ही गुरुकिल्ली कशी हाताळतात, ते वाचन कसे करतात, कुठली पुस्तके वाचतात, वाचनाची त्यांची विशिष्ट अशी काही पद्धत आहे की कसे, वाचनासाठी त्यांनी काय–काय धडपडी केलेल्या आहेत, हे समजावून घेणे मोठे मजेचे तसेच बोधप्रदही ठरते

जगातील कुठल्याही थोर पुरुषाच्या चरित्राचे परिशीलन केल्यास त्याच्या जीवनावर, त्याच्या आचरणावर, त्याने केलेल्या वाचनाचे परिणाम काय व कसे झाले आहेत हे कळून येते श्रम सामर्थ्य व वय याच्या मर्यादा न पाळता अशा यशस्वी पुरुषानी वाचनासाठी केलेल्या धड-पडीचे आपल्यास कुतूहल वाटत आणि आत्मोन्नती साधण्यासाठी स्वत ला वाचनाची सवय लावून घेण्याची प्रेरणा होत असते लोकहितवादी गोपाळराव देशमुख यानी वाचनासाठी केलेल्या परिश्रमाची मला इथ याद येते लहानपणापासून ते ज्ञानासक्त त्याच्या काळी पुण्यात पुस्तकाची दुकानही नव्हती सरकारी दुकानातून शाळेस उपयुक्त तेवढीच पुस्तके असत लोकहितवादी म्हणून युरोपियनाच्या ओळखीन पुस्तके आणून वाचून ती परत करीत यासाठी ते कधा कधी नदीच्या काठाकाठाने खडकीपर्यंत चालत जाऊन विद्वान इग्रजाकडून पुस्तके मिळवीत व त्याची व्याख्याने एकून रात्री पायीच परत येत

वयाच्या नव्वदाव्या वर्षी ग्लॅडस्टन नहमी खिशात एखाददुसरे पुस्तक बाळगीत असे उद्देश हा की, थोडासा जरी फुरसतीचा वेळ मिळाला तरी तेवढ्यात त्या पुस्तकाच वाचन करता येईल, आपल्या ज्ञानात व विचारात थोडीफार नवी भर घालता येईल आज माणूस साठी सत्तरात गेला की बहुधा थकता ऐंशाची उमर झाली की त्याला आपण जुने खोड समजू लागतो पण ग्लॅडस्टनचा गाष्ट निराळी होती त्याचे मन व विचार वृद्धपणातहा अगदा ताज, उत्साहदायी असत अनेक वृत्त पत्रकार व सपादक त्याला आपापल्या नियतकालिकासाठी नवे नवे विचार प्रसृत करणार लेख लिहिण्याची विनती करीत आणि हे कधी? तर त्याच्या वयाच्या ८५ व्या वर्षी ! एवढ्या वयापर्यंत त्याचे मन उत्साही नि कार्यक्षम राहिले याचे कारण त्याचे वाचन वाचनाच्या द्वाराच तो आपल्या मनाला रोज नव्या विचाराचे खाद्य पुरवीत राहिला होता

बेंजामिन फ्रॅंकलिन हा वयाच्या सतराव्या वर्षापर्यंत दरिद्री, रस्त्यात भटकणारा मुलगा होता. या भटक्या पोराची मैत्री संपादन करण्यासाठी पुढे जगातील सगळे सुसंस्कृत लोक उत्सुक होऊन राहतील, असे त्या वेळी कुणाच्या मनातही आले नसेल मनाची ही सुसंस्कृतता संपादण्यासाठी फ्रॅंकलिन काही कुठल्या विद्यापीठात गेला नाही. त्याने फक्त जगातील चांगल्या ग्रंथांचे अखंड वाचन चालू ठेवले. पुस्तके विकत घेणे त्याच्या आवाक्याबाहेरचे होते. म्हणून हवे असलेले पुस्तक संध्याकाळी मिळाले व ते दुसऱ्या दिवशी सकाळी परत करायचे असले तर तो सगळी रात्र जागून ते वाचून काढी. फ्रॅंकलिनने संपादन केलेले सर्व ज्ञान त्याने चिकाटीने केलेल्या वाचनाचेच फळ होते. 'मनुष्याने भरपूर वाचन केल्याशिवाय तो आयुष्यात यशस्वी व सुसंस्कृत होणे शक्य नाही,' असे फ्रॅंकलिन नेहमी म्हणत असे.

अब्राहम लिंकन तर एकदा हवे असलेले पुस्तक विकत घेता येईना व जवळपास कुणाकडे मिळेना, म्हणून ते उसने मिळविण्यासाठी चाळीस मैल पायी चालत गेला होता !

ज्ञानोपासनेच्या या सुलभ मार्गाचे—वाचनाचे—महत्त्व सांगताना वरीलसारखी पाश्चात्य पंडितांचीच उदाहरणे देता येतील असे नाही. आपल्याभोवताल्च्या समाजधुरीणांची, राष्ट्रनेत्यांचा, शास्त्रज्ञांची, साहित्यिकांची जीवनचरित्रे आपण पडताळून पाहिली तरी त्यांच्या जीवनातील यशस्वितेचे मूळ त्यांनी प्रयत्नपूर्वक केलेल्या वाचनातच असल्याचे आपणास आढळून येईल.

न्यायमूर्ती तेलंग यांच्याबद्दल असे सांगतात की, सार्वजनिक कामाची जबाबदारी अंगावर घेण्यापूर्वी त्यांनी पूर्वतयारी म्हणून विस्तृत वाचन केले. त्यांचे सर्व वाचन निवडक, आस्थेवाईक व एकाग्रतेने झाले. मनाला

एकाग्रता यावी म्हणून त्यांनी भूमिती वाचून तिच्यातील कूट प्रश्न सोडविण्याचा क्रम ठेवला होता वाचनात एकाग्रता साधू लागल्यावर त्यांनी ' रिलिजन ऑफ प्रॉटेस्टंट ' या ग्रंथाचे दोन मोठाले खंड घेतले व ते वाचून त्यातील सारांश आपल्या भाषेत लिहून काढला त्यानंतर प्लेटोचे संवाद घेऊन त्यातील विचारसरणी साधकबाधक प्रमाणासह लिहून काढली त्यानंतर बायबलवरील डॉ. स्ट्रॉसचा टीकाग्रंथ त्यांनी वाचला. एवढ्या तयारीनंतर त्यांनी भगवद्गीता घेतली व तिचे बारीक वाचन करून इंग्रजी पद्यात्मक भाषांतर केले. त्यानंतर त्यांनी शांकर भाष्याचे वाचन केले. एखाद्या विषयाचा आपल्याला सर्व बाजूंनी विचार करण्याची सवय लागावी व आपल्या चिकित्सक बुद्धीला अधिक कुशाग्रता यावी यासाठी त्यांनी जॉन स्टुअर्ट मिल्ल्या ग्रंथाचे वाचन आरंभले मिलनंतर त्यांनी हक्स्ले, टिंडल, हर्बर्ट स्पेन्सर यांचे ग्रंथ लक्षपूर्वक वाचले आणि त्यानंतर डार्विनचे ग्रंथ वाचले.

हे ग्रंथ तेलंगानी कोणत्या पद्धतीने वाचले, या गोष्टीचे महत्त्व विशेष आहे. त्यांची पद्धत अशी असे एखादा ग्रंथ वाचला की त्याचे रहस्य समजून घेण्याकरिता ते त्याच प्रकारचे दुसरे ग्रंथ वाचीत असत इतकेच नव्हे तर, एखाद्या विषयाची एक बाजू दाखविणारे ग्रंथ वाचल्या-वर त्या विषयाची उलट बाजू समजून घेण्यासाठी दुसऱ्या बाजूचेही ग्रंथ वाचीत असत वृत्तपत्रे ते संध्याकाळी किंवा कोर्टात जाताना गाडीत वाचीत असत सकाळचा वेळ ते या कामासाठी केव्हाही खर्चीत नसत सकाळी ते महत्त्वाची व विचारप्रवण करणारी पुस्तके वाचीत असत. वायफळ वाटणारे कुठलेही पुस्तक ते सहसा वाचीत नसत

विद्यार्थीदशेत जेव्हा एखाद्याला वाचनाची गोडी लागते तेव्हा त्याला त्यासंबंधात योग्य मार्गदर्शनाची जोड मिळाली तर माणसाचे मन वायफळ

वाचनाकडे वळत नाही व पुढील आयुष्यात उपयुक्त ठरेल असे वाचन त्याच्या हातून होऊ शकते. पण वाचनाबाबत योग्य मार्गदर्शन मिळण्याची संधी आज तरी आपल्या देशातील फारच थोड्या विद्यार्थ्यांच्या वाट्यास येत असेल.

योग्य मार्गदर्शनाच्या अभावी तरुण विद्यार्थ्यांच्या हातून भरमसाट वाचन कसे होते याबद्दल प्रो. फडक्यांची एक आठवण उल्लेखनीय आहे. डिकन्सच्या 'ए टेल ऑफ टू सिटीज' या पुस्तकाने वाचनाची हौस त्यांच्या मनात निर्माण झाली. मात्र वाचनाच्या बाबतीत त्यांना चांगला मार्गदर्शक मिळाला नाही. त्यामुळे हौसेच्या भरात मिळेल ते पुस्तक वाचण्याचा त्यांनी सपाटा सुरू केला. फर्ग्युसन कॉलेजच्या लायब्ररीतील कादंबरी विभागावर त्यांनी हल्ला चढविला. स्कॉट, डिकन्स, रेनॉल्ड्स्, मेरी कॉरेली वगैरेंची जी पुस्तके त्यांच्या हाती लागली ती वाचून काढण्याचा त्यांनी धोशा लावला. ते म्हणतात, 'वाचनाच्या बाबतीत लूटमार करताना हाताला लागेल ते घेऊन पळणाऱ्या सैनिकाप्रमाणे आपण त्या वेळी वागलो.'

आयुष्यातील यशस्वितेस कारण होणारे वाचन, योग्य रीतीने व नियमितपणे होण्यास मार्गदर्शनाचे कसे साहाय्य होत असते, याबाबत श्री. नारायणराव चंदावरकर यांचे उदाहरण देता येईल. कॉलेजात जे शिकविले जाई तेवढ्यावरच तृप्त न होता बाहेरचे व आपल्याला उपयुक्त होईल असे वाचन त्यांनी प्रयत्नपूर्वक चालू ठेवले होते. त्यांचे मामा शामराव विठ्ठल हे मोठे अभ्यासू व विद्वान गृहस्थ होते. ते नारायणरावांना नेहमी पुस्तकांच्या दुकानात बरोबर घेऊन जात व तेथून उपयुक्त व नवी पुस्तके खरेदी करीत. ते ती पुस्तके स्वतः वाचीत व वाचलेल्या पुस्तकाचे इंगित आपल्या भाषेत लिहून ठेवीत. नारायणराव चंदावरकरांना

वाचनाची आवड व वाचलेल्या पुस्तकातील महत्त्वाचा भाग लिहून ठेवण्याची सवय त्याच्या मामानीच लावली विकत घेतलेली पुस्तक आपल्या भाच्यान वाचली की नाहीत, याची चौकशी शामराव विठ्ठल साक्षेपाने करीत असत याचा परिणाम असा झाला की, मामाच्या टेबलावर कोणतेही चांगल पुस्तक दिसले की नारायणराव ते वेळ काढून वाचून टाकीत, आणि कधा कधी तर मामा वाचायला विसरलेली पुस्तक वाचून काढून नारायणराव त्यातील टिपणेही काढून ठवात

। वाचनामुळे मनाला विरंगुळा नि समाधान लाभते हे निर्विवाद. मनाचा ढळलेली शाती पुन्हा मिळविण्यासाठी माधव ज्यूलियन नेहमी वाचनाचा आसरा घेत ते चिंताक्रात असले की, बहुधा गाथा–चरित्राकड वळत आणि त्यातील आवडती प्रकरणे वाचू लागत या वाचनामुळे त्याचा त्रास, मनस्ताप नाहीसा होई व मन पूर्ववत शात होई

वाचन जसे दैनदिन कटकटींची विस्मृती पाडत, तसेच जावनातील उणिवाबद्दल, सकटाबद्दल जागृती देऊन मनाला कार्यप्रवण करीत असत पडित जवाहरलाल यांनी याबाबत व्यक्त केलेल विचार आणि त्याचा एक अनुभव या दृष्टीन लक्षात ठेवण्यासारखा आहे

तुरुगात वाचनात त्याचा वेळ जाई एका विषयाचे वाचन सपल का दुसरा विषय घ्यावा, अस त्याचे वाचन चालत असे पण विषय बहुधा जडच असत कादबऱ्यामुळे मन सुस्त होत, म्हणून ते त्या फारशा वाचीत नसत हूएनत्सग, मार्कोपोलो आणि इब्नबतूता वगैरे जुन्या प्रवाशाच इतिहास, आणि मध्य आशियाचा प्रवास करणारा स्वेन हेडिन व टिबेटमध्ये अनक सकटाशी झुजणारा रौरिश वगैरे आधुनिक प्रवाशांची वर्णने नेहमीच त्याना वाचावीशी वाटत चित्राची पुस्तके व त्यातल्या त्यात पर्वताच्या, हिमनद्याच्या, वाळवंटाच्या चित्रांची पुस्तके त्याना दूर

करवत नसत. विस्तृत प्रदेश, अफाट महासागर व गगनचुंबी पर्वत यांच्या दर्शनासाठी तुरुंगात दृष्टी तहानेलेली असल्यामुळे अशा चित्रसंग्रहाची महती विशेषच असे. माउंटब्लॅक, आल्प्स व हिमालय यांची सुंदर चित्रे असलेला एक संग्रह त्यांच्याजवळ होता. कोठडीतील वातावरण ११५ अंशापर्यंत वर पोचले अथवा त्याच्याही वर गेले की जवाहरलाल तो संग्रह उघडून हिमनद्यांच्या चित्राकडे पाहात बसत! नकाशा संग्रहामुळे त्यांच्या मनात अनेक विचार सुरू होत.

तुरुंगातील फुरसतीच्या वेळीच नव्हे, तर नित्याच्या कार्यव्यग्र जीवनातही जवाहरलालजींचे वाचन सतत आणि अव्याहत चाललेले असे. 'पैसे उधळण्याची फक्त एकाच बाबतीत मला चटक लागलेली आहे, आणि ती सुटणेही शक्य नाही. ती बाब म्हणजे पुस्तके खरेदी करणे' असे ते म्हणत असत.

पुस्तके ही आपणास कशी मार्गदर्शन करू शकतात, स्फूर्ती देतात, कार्यप्रवण करीत असतात, हे वरील थोरामोठ्यांच्या उदाहरणावरून दिसून येते. पुस्तके निवडावीत कशी, ती वाचावीत कशी, याबद्दल इतर व्यासंगीजनांच्या अनुभवावरून काही स्थूल नियम बनवता येत असले तरी ती केव्हा वाचावीत याबद्दल, मला वाटते, काही नियम करता येणार नाहीत. कारण वाचकांपैकी काहीजणांना सकाळच्या शांत वेळी वाचन करणे पसंत असेल, तर काही सायंकाळी थकल्याभागल्या मनाला विसावा देण्यासाठी पुस्तक हाती घेत असतील; काही रात्री कामेधामे आटोपल्यावर अगदी आरामशीरपणे अंथरुणात वाचन करीत असतील, आणि काही फावेल तेव्हा वाचीत असतील.

गडकऱ्यांबद्दल असे सांगतात की, ते चोवीस तास विचारात किंवा वाचनात व्यग्र असत. त्यांची वाचनपद्धती अतिशय बारकाव्याची असे.

त्यांच्या लिखाणात जे अनेक वाङ्मयात्मक संदर्भ जियेतिथे सापडतात त्याचे कारण हेच होय.

महामहोपाध्याय प्रा. द. वा. पोतदार यांचे वाचन चोवीस तासांत हवे तेव्हा चाललेले दिसून येते. जेव्हा पाहावे तेव्हा त्यांच्याजवळ ग्रंथांचा आपला डोंगरच पडलेला दिसतो. त्यांच्या ग्रंथसंग्रहासारखा प्रचंड ग्रंथसंग्रह क्वचितच एखाद्याजवळ असेल.

वाचन केव्हा करावे याप्रमाणे ते किती करावे या बाबतीतही उत्साही वाचकांना निश्चित नियम सांगणे शक्य होणार नाही. काही विद्वानांच्या मते, बौद्धिक उन्नतीसाठी भरपूर वाचन केले पाहिजे; तर काहींच्या मते माणसानी मोजकेच वाचावे; भाराभर पुस्तके वाचून त्यांच्या कर्त्यांची नावेही लक्षात न राहण्यापेक्षा मनावर कायम ठसा ठेवील इतकेच वाचन केलेले बरे. ' बदलापूर ' या प्रसिद्ध ग्रंथाचे कर्ते श्री. ना. गो. चापेकर यांनी आपल्या वाचनाबद्दल असे म्हटले आहे की, ' लोकांचा समज असा आहे की, माझे वाचन अफाट आहे. परंतु वस्तुस्थिती तशी नाही. मी फार थोडे वाचले आहे. भाराभर पुस्तके वाचून स्वतंत्र विचार करण्याची शक्ती नष्ट होते असे माझे मत बनत चालले आहे. '

याच्या उलट इतिहासाचार्य राजवाडे, पांगारकर किंवा शिवरामपंत परांजपे यांनी केलेल्या वाचनाची गोष्ट आहे. परांजपे डेक्कन कॉलेजात ' फेलो ' असताना त्यांनी त्या कॉलेजच्या लायब्ररीतील बहुतेक सर्व संग्रह वाचला होता. फार काय, फ्रेंच, जर्मन, इटालियन भाषांतील श्रेष्ठ लेखकांच्या ग्रंथांची भाषांतरे मिळवून तीही त्यांनी वाचली होती. पांगारकरांचे वाचनही असेच अफाट होते. नगर–वाचनालयाला त्यांच्यासारखा वाचक कोणी भेटला नसेल. वाचनालयाच्या सेक्रेटरीशी त्यांनी संधान बांधले होते. त्यांच्याकडून किल्ल्या घेऊन कपाटे चाळायची,

लागतील ती पुस्तके घ्यायची आणि माडीवर जाऊन दुपारी बारा ते रात्री आठ वाजेपर्यंत वाचीत बसायचे, असा त्याचा येक महिने क्रम असे.

कल्हा वाचावे व किती वाचावे या दोन प्रश्नापेक्षा मला वाटते कसे वाचावे या प्रश्नाकडे जास्त चिकित्सन पाहण अगत्याचे आहे निरानिराळ्या व्यासगी व विद्वान गृहस्थाच्या वाचनाच्या पद्धती अभ्यासणे यासाठी आपणास हिताच होईल. सथपणे मनन करीत वाचन करण काहींच्या मते श्रयस्कर असत, तर काहाजण थोड्या वळात विस्तृत वाचन व्हावे म्हणून झपाट्यान वाचण पसत करतात. न चिं केळकर याचे वाचन असे शीघ्र गतीने होत असे ते इतक्या जलद गतीने पुस्तक वाचीत की, माधारण माणसाला त्याच आश्चर्यच वाटे दुपारी ११ वाजता ते कचेरीत येत आणि ५ वाजपर्यंत वाङ्मयक्षेत्रात वावरत त्याच्या जलद वाचनामुळ त्याना पुस्तक पुरत नसत. ते मुबईला गेले की रॉयल एशियाटिकमध्ये किंवा तारापूरवाल्याकड हटकून जायचे व नवीन पुस्तके खरेदी करायचे केळकर जलद वाचीत म्हणून ते अभ्यासूपणाने वाचीत नसत असे मात्र नाही 'केसरी'च्या ग्रथालयातील एखादे पुस्तक काढून पाहिले तर त्यावर केळकरांनी वाचतावाचता केलल्या खाणाखुणा हटकून आढळतील.

अन्याची वाचनपद्धती अशी आहे एखाद्या विशिष्ट लेखकाची पुस्तके त्याना वाचायला धतली की अव्याहतपणे तीन चार महिने ते तीच पुस्तके वाचतात त्याचे सगळच वाचन नारकोर्दन होते कारण पुस्तक ही आपल्या धद्याची हत्यार आहेत असे त समजतात.

हरिभाऊ आपट्याना वाचनाचे जबरदस्त वेड होते. ते स्वत तर भरपूर वाचीतच, पण वाचलल्या पुस्तकातील उत्तमोत्तम भाग आपल्या मित्राना मोठ्याने वाचून दाखवणेही त्याना आवडत असे

डॉ आंबेडकरांचे वाचन अफाट होते त्यांची वाचनपद्धतीही अनुकरणीय आहे आंबेडकर कुठेही वाचू शकत. त्यांना वाचनासाठी शांत वातावरणच लागे असे नाही ते गर्दीतही वाचू शकत दिवसाच्या कुठल्याही वेळी त्यांचे वाचन चालू असे कुठलेही पुस्तक वाचायला घेतले की ते ते सारख्याने वाचत असे नव्हे, तर त्याच्या वक्तव्याच्या आतील माहितीही वाचून काढीत त्या माहितीवरून त्याच लेखकाच्या इतर पुस्तकांची माहिती मिळवून तीही पुस्तके आणवून ते वाचून काढीत. दरेक पुस्तकात ज्या इतर पुस्तकांचा सदर्भ आलेला असेल ती मूळ पुस्तकेही ते नतर आणून वाचत यामुळे एकदा त्याचे वाचन सुरू झाले की, ते साखळी पद्धतीने सारखे चालूच राही

जे पुस्तक लागेल ते तातडतोब मिळाले पाहिजे हा त्यांचा दाडगा कटाक्ष पुस्तकासाठी ते नेहमीच अधीरे होऊन जात आणि ते मिळाले नाही तर त्याना चैन पडत नसे कुठल्याही विषयावर मत द्यायचे अगर बनवायचे असले तर ते त्या विषयावरील उलटसुलट मते देणारी सर्व पुस्तके वाचीत

वाचताना त्यांच्या हातात नेहमीच पेन्सिल असे पुस्तकांच्या पानावर ते ठिकठिकाणी खुणा करीत जात विशिष्ट स्टडी-रूममध्ये बसून वाचायचे असा त्यांचा कटाक्ष नसे. बहुश त्यांच्या प्रत्येक खोलीत पुस्तके पडलेली असत व दरेक पुस्तकात खुणा करण्यासाठी एकेक पेन्सिलही असे कधी कधी एकाच वेळी ते दोन-दोन, तीन-तीन ग्रथ वाचीत असत त्यांच्या सग्रहीच्या मुबईतील ग्रथांची सख्या सुमारे २२००० इतकी होती दिल्ली येथेही त्यांच्या सग्रहात १५००० तरी पुस्तके असावीत

आपली सर्व पुस्तके कुठल्या शेल्फवर कुठे आहेत हे त्यांच्या चागले लक्षात असे आयत्या वेळी कुठले पुस्तक लागले व जवळ जाणता मनुष्य

नसला तर ते गुरख्यालाही अमुक फळीवरील अमुक ठिकाणचे पुस्तक घेऊन ये म्हणून सांगत. गुरखा अक्षरओळख नसलेला असला तरी तो ते पुस्तक अचूक आणून देऊ शके. ठेवलेल्या पुस्तकाची जागा इतक्या पक्केपणी त्याच्या लक्षात असे.

पुस्तक वेळेवर हाती पडले पाहिजे यासाठी एकेका पुस्तकाच्या पाच पाच प्रतीही ते विकत घेत. त्यांच्या वाचनात चरित्र-वाङ्मय फार. नेपोलियनचे चरित्र त्यांना फार प्रिय. नेपोलियनची कैक निरनिराळी चरित्रे त्यांच्याकडे होती. बायबलच्या इतक्या निरनिराळ्या आवृत्त्या त्यांच्याकडे असत की तितक्या एखाद्या पाद्र्याकडेही नसतील!

पुस्तकाच्या दुकानात ते कधी गेले तर ३–४ तास बाहेरच येत नसत. तेथील सगळी पुस्तके ते चाळीत राहात.

डिक्शनऱ्यांची तर त्यांच्याकडे रासच असे.

रात्री दोन वाजेपर्यंत त्यांचे वाचन चाले. झोपेत मध्ये जाग आली तरी ते उठून वाचन सुरू करीत आणि कधीकधी वाचनात इतके मग्न होऊन जात की, पुस्तक मिटून खाली ठेवीतोवर बाहेर दिवस फुटून वर येत असे!

पुस्तके वाचताना ती अत्यंत चांगल्या रीतीने वापरण्याची त्यांची पद्धती होती. ती ते जरासुद्धा खराब होऊ देत नसत. वाचलेली व आवडलेली पुस्तके पुनःपुन्हा वाचण्याचाही त्यांना नाद होता.

थोरामोठ्यांच्या अशा अनेक अनुभवावरून पुस्तके ही आपले मार्गदर्शक, गुरु, सोबती कशी होऊ शकतात हे स्पष्ट दिसून येते. आपल्या वाचनात येणारे एखादे पुस्तक तर कधी कधी असे प्रभावी ठरते की आपला किंवा आपल्या परिवारातील एखाद्याचा जीवनप्रवाहसुद्धा त्यामुळे बदलू शकतो. रस्किनच्या 'अन्टु दि लास्ट' या पुस्तकाच्या वाचनामुळे

आपला जीवनप्रवाह कसा बदलला, आपली विचारसरणी कशी पालटली, याची हकीकत गांधीजींनी आपल्या 'सत्याचे प्रयोग'त सांगितली आहे. जोहान्सबर्गहून डर्बनला जाताना प्रवासात वाचण्यासाठी म्हणून श्री. पोलक यांनी ते पुस्तक गांधीजींना दिले होते. गाडी चालू होताच गांधीजींनी ते वाचायला सुरवात केली आणि ते म्हणतात, —'पुस्तक वाचून होईपर्यंत मी ते खाली ठेवू शकलो नाही, आणि ते वाचून झाले तरी रात्रभर मला झोप आली नाही. त्या पुस्तकातील विचारसरणीला अनुसरून आपला जीवनक्रम बदलून टाकण्याचा मी निश्चय केला साधी राहणी, शारीरिक श्रमाची महती व दुसऱ्याचे कल्याण तेच आपले कल्याण, ही तीन मूल्ये मी त्या ग्रंथाच्या वाचनामुळे शिकलो.' पुस्तक आपणास काय शिकवीत नाहीत बरं!

एकटे कसे राहावे हे शिकायचे असले तर पुस्तके जशी मदत करतात, तसेच लग्न करून सुखी संसार कसा करावा हे शिकवायलाही पुस्तके तयार असतात. जाड असलात तर बारीक कसे व्हावे, बारीक असलात तर जाड कसे व्हावे, हे पुस्तके आपणास सांगतात. हिशेब कसे ठेवावे, यंत्रे कशी दुरुस्त करावीत, घरे कशी बांधावीत, प्रेम कसे करावे, जमीन कशी नांगरावी, चित्रपटात प्रवेश कसा मिळवावा, प्रौढ स्त्रियांनी आपल्या चेहऱ्यावरील सुरकुत्या कशा घालवाव्या,—फार कशाला मृतांचे अंत्यविधी कसे करावेत, हेही आपणाला पुस्तके सांगू शकतात.

पुस्तकांच्या साहाय्याने आपण जीवनातील अनेक संकटे ओलांडून यशाची वाट चालू लागतो म्हणूनच पुस्तके वाचली पाहिजेत,—मिळतील तितकी वाचली पाहिजेत,—मुद्दाम मिळवून वाचली पाहिजेत.

◆ ◆ ◆

प्रकरण तिसरे

# वर्षास शंभर पुस्तके

साहित्याची आवड असणारे व स्वत थोडेबहुत लिहिण्याचा प्रयत्न करणारे काही तरुण मित्र मला कधी कधी भेटायला येतात. गप्पा मारताना, त्याच्यापैकी बहुतेक जण मला नेहमी विचारतात, 'तुम्हाला विशेष कसली आवड आहे किंवा तुम्हाला विशिष्ट असा काय छंद आहे ?'

मी बहुतेक वेडी राने, जगले, शिकार व असेच काही तरी साहस विषयक लिहीत असल्यामुळे, मला शिकारीचा किंवा इतर साहसाचा छंद असावा ही त्याची अपेक्षा असते

पण मी जेव्हा त्याना सांगतो की माझा आवडता छंद आहे वाचन व वाचनासाठी पुस्तके गोळा करणे, तेव्हा या मित्रमंडळींना काहीसे आश्चर्य वाटते त्याना हे खरं सुद्धा वाटत नाही

'वाचन ?' त्याच्यापैकी एखादा उद्गारतो, 'आम्हाला तर वाटत होते की तुम्हाला शिकारीचा किंवा होडीतून दर्यात दूरवर फिरत जाण्याचा नाद असेल म्हणून ! तुमच्या ज्या गोष्टी आम्ही वाचतो त्या तर सर्व साहसकथा असतात '

मी हसून म्हणतो, 'मग वाचन हे साहस नाही असं वाटतं की काय तुम्हांला ?'

वाचनात कसलं एवढं साहस आलंय् असा भाव चेहऱ्यावर आणून माझे मित्र मजकडे पाहू लागतात.

मी म्हणतो, 'वाचन हे सुद्धा एक साहसच आहे. तुम्हांला आगाखानाची गोष्ट ठाऊक आहे का ?'

आगाखानांना लहानपणीच वाचनाची मोठी चटक लागून राहिली होती. त्यांच्या इंग्रज शिक्षकामुळे त्यांना ही सवय लागली होती व वयाच्या दहाव्या वर्षीच त्यांची ही सवय अगदी दुर्दमनीय होऊन राहिली होती. दोन-तीन वर्षांत त्यांनी घरच्या संग्रहालयातील बहुतेक पुस्तके वाचून काढली आणि आता वाचण्यासाठी पुस्तके कुठून आणायची हा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला. पुस्तके विकत घ्यायची तर त्याची आई त्यांना पैसा मुळीच देत नसे.

यातून वाट कशी काढावी याचा ते व त्याचे एक चुलतभाऊ मिळून विचार करू लागले आणि दोघांनी विचार करून एक बेत कायम केला.

जवळच एक पुस्तकांचे दुकान होते. त्यातून पुस्तके पळविण्याचे त्यांनी ठरविले. एके दिवशी त्या दोघांनीही अंगात अब्बे चढविले. (अब्बा म्हणजे पोकळ व लांबलचक झगा) आणि त्यांनी त्या पुस्तकांच्या दुकानात प्रवेश केला. त्यांच्यापैकी एकजण दुकानदाराशी बोलू लागला आणि दुसरा मांडणीवरील हरतऱ्हेची पुस्तके चाळू लागला. चाळता, चाळता आवडलेली पुस्तके त्याने अब्ब्याच्या आतील खिशात लपवून घेतली.

थोड्या वेळाने ते दोघेही दुकानातून बाहेर पडले आणि घरी येऊन त्यांनी त्या नव्या पुस्तकावर अधाशासारखा ताव मारला. बरेच दिवस

त्याचा हा कार्यक्रम चालू होता. हळूहळू त्या दुकानदारास संशय येऊ लागला. त्याच्या दुकानातील किंतीतरी पुस्तके अलीकडे नाहीशी झाली होती. आणि नेमकी ही मुले येऊन गेली की पुस्तकाची तूट येत असल्यामुळे त्याला या मुलाचा संशय येऊ लागला होता.

पण चांगल्या घरच्या या मुलावर बालंट घेणे हेही जरा धाडसाचे होते. तथापि अखेर नाइलाज होऊन तो दुकानदार एके दिवशी त्याच्या घरी आला व त्याच्या चुलत्याच्या कानावर त्याने ही हकीकत घातली. अर्थातच त्याच्या आईने सगळे पैसे लागलीच देऊन टाकले व त्याच्या चुलत्यानी त्याना चागलाच धडा शिकविण्याचे ठरविले. दुकानदार घरी येऊन पैसे घेऊन गेल्याची हकीकत त्या दोघाच्या कानावर घालण्यात आली नाही. त्यामुळे पहिली पुस्तके वाचून संपताच ते दोघे भाऊ पुन्हा एके दिवशी अंगे चढवून त्या दुकानात गेले.

ते दोघे दुकानात गेलेले पाहताच त्याचे चुलते त्याना संशय येऊ न देता त्याच्या मागोमाग हळूच दुकानात येऊन दाखल झाले. दरम्यान त्या दोघानी आपल्या अंग्याच्या आतील खिशात दोन-दोन, तीन-तीन पुस्तके भरून घेतली होती व ते घरी परतण्याच्या बेतात होते.

काका दुकानात आलेले पाहताच ते दोघेही घाबरले. त्याच्या काकानी आत येताच दोघानाही खडसावले, ' बाबा. तुमचे अंगे काढा पाहू अगोदर. '

आगाखान व त्याचे बंधू जागचे जागी चुळबुळ करू लागले. आपली चोरी आता उघडकीस येणार आणि दुकानदार व त्याचा नोकर याच्यासमोर आपली शोभा होणार हे त्यानी ओळखले.

' चला, अंगे काढा अगोदर ' चुलत्यानी पुन्हा दम भरला.

करतात काय ! अखेर त्यांनी अगातून कोट काढण्यास सुरवात केली आणि त्याबरोबर त्यात लपवून ठेवलेली नवी कोरी गोष्टींची पुस्तकं धडाधड खाली पडली त्या दोघांचेहि चेहरे मोठे बघण्यासारखे झाले होते दुकानदाराची व काकांची माफी मागता मागता त्यांना पुरेवाट झाली अगदी !

पण नंतर त्यांची वाचनाबद्दलची ती दुर्दमनीय इच्छा जाणून त्यांना पुस्तकं खरीदण्यासाठी घरून ठराविक पैसे मात्र मिळू लागले

मी माझ्या मित्रास म्हणतो, ' आगाखानाचा हा अनुभव ऐकल्यावर वाचन हे पण एक साहसच आहे हे तुम्हास सहज पटेल ! '

माझे मित्रही मग हसतात पण त्यातील एकजण म्हणतो, ' पण सगळ्याच वाचकाच्या वाट्याला काही असले अनुभव येत नसतील ! '

' काय सांगावे, वाचनाची गोडी लागली तर कदाचित असला अनुभव तुमच्याही वाट्याला कशावरून येणार नाही ? ' मी त्याला म्हणतो माडखोलकरांची स्वतःच्या वाचनाबद्दलची मी वाचलेली एक आठवण तुम्हाला सांगतो शाळेत असताना माडखोलकरांना वर्गातील मुलांच्या संगतीने शाळा चुकविण्याचा सवय झाली होती पण शाळा चुकविल्यानंतर समुद्रावर जाऊन बसणं काही सोपी गोष्ट नव्हती सकाळी ११ ते सायंकाळी ५ वाजपर्यंत वेळ घालवायचा कसा हा त्यांना एक प्रश्नच पडला होता वाचनाशिवाय वेळ घालविण्याचं त्यांच्यापाशी दुसरे साधन नव्हते समुद्रावर जाताना ते बरोबर भक्तिप्रल्हादासारखे एखादे पुस्तक नेत असत पण ते पाच सहा तासपर्यंत पुरत नसे त्यामुळे वाचण्यासाठी स्वतःच पुस्तकं विकत घेण्यावाचून इतर मार्ग त्यांना उरला नाही पण पुस्तकं विकत घ्यायला पैसे कुठून आणायचे हा आगाखानाप्रमाणेच त्यांनाही प्रश्न पडला

वडिलाकडून त्यांना पैसे सहसा मिळत नसत. कधी पैसे लागले तर ते ताईकडून मिळायचे. त्यामुळे त्यांनी पुस्तकांसाठी तिच्याकडेच पैसे मागितले. अर्थातच अभ्यासाची पुस्तके हवीत म्हणूनच त्यांनी सांगितले. पहिल्यावेळी ताईंनी त्याना पैसे दिले आणि त्यांनी त्यांची काही पुस्तके खरेदी केली. पण ती वाचून होताच पुन्हा नवी पुस्तके आणायची त्यांना वेळ आली. पण जेव्हा त्यांनी नव्या पुस्तकांसाठी ताईजवळ पैसे मागितले, तेव्हा ताई रागाने म्हणाल्या, ' दर महिन्याला कसली नवी पुस्तके विकत घेतोस ! '

माडखोलकरांनी त्याना आश्वासन दिले की, जेवढे पैसे त्या देतील तेवढ्याची पुस्तके आणून आपण त्याना दाखवू; पण ताईजवळ पैसे नव्हते म्हणून म्हणा, अगर आळसामुळे म्हणा ताईंनी त्यांना बाबाच्या खिशातून हवे असलेले पैसे काढून घेण्यास सांगितले.

माडखोलकरानी म्हटले, ' पण मी पैसे काढून घेतले असे कळले तर बाबा रागावतील ना ? '

ताई म्हणाल्या, ' मी बाबाना नतर सागेन. पण ते कधी पैसे मोजून ठेवताहेत ! तू किती पैसे घेतलेस ते कळणारही नाही त्याना ! ' त्या हे शब्द अगदी सहज म्हणाल्या. पण त्याचा परिणाम मात्र अगदी उलट झाला.

माडखोलकरानी ताईंना सागितले होते त्यापेक्षा थोडेसे जास्तच पैसे काढून घेतले. पण तो प्रकार उघडकीस आला नाही. त्यामुळे धीर येऊन पुढे पुस्तके घ्यायची झाली की ते बाबाच्या खिशातून पैसे काढून घेत. त्याच्या घरात नतर ही गोष्ट सगळ्यानाच ठाऊक झाली होती. पण पुस्तके विकत घेण्याशिवाय दुसरे कोणतेही व्यसन त्याना नाही याची त्या सगळ्याना जाणीव असल्यामुळे त्यानी त्याच्या त्या कृत्याकडे

दुर्लक्ष केले. पुस्तके विकत घेण्याचा प्रश्न अशा रीतीने सुटल्यामुळे त्याचा समुद्रावर वेळ मजेत जाऊ लागला व नाताळच्या रजेनतर ते एकही दिवस शाळेत गेले नाहीत

'वाचन म्हणजे मोठेच व्यसन म्हणायला पाहिजे तर' ही हकीकत ऐकून मित्रांपैकी एखादा उद्गारतो.

'व्यसन म्हणा पाहिजे तर' मी म्हणतो मात्र इतर अनेक व्यसनाप्रमाणे ते अवनतिकारक मात्र नाही. उलट ज्याला आत्मोन्नती साधायची असेल त्याला वाचनासारखे दुसरे साधन नाही. मग ते तुम्ही व्यसनात का जमा धरा ना! मला इथे खाडेकराची आठवण येते खाडेकर आपला वाचनाचा छद व्यसनच समजतात.

आपल्या लहानपणच्या वाचनाच्या छदाबद्दल खाडकरानी एके ठिकाणी लिहिले आहे की, 'माझा वाचनाचा नाद–छ! ते व्यसनच होते–असा बळावला होता की, बोलून साय नाही मामाच्या नावावर रोज लायब्ररीतून एक पुस्तक आणून त्याचा हा हा म्हणता मी फडशा पाडीत अस 'गड आला पण सिंह गेला' ही हरिभाऊची कादबरी मी एके दिवशी झपाट्याने वाचून काढली तिने मला इतका चटका लावला की हे पुस्तक आपल्यापाशी असलच पाहिजे अशी तीव्र इच्छा माझ्या मनात उत्पन्न झाली कुठलीहा इष्ट वस्तू सपादन करण्याचे भिक्षा, उसनवारी आणि चोरी हे तीनच मार्ग दरिद्री माणसाला उपलब्ध असल्यामुळे आणि त्यातले पहिल दान यशस्वी होण्यासारखे नसल्यामुळे ते पुस्तक लायब्ररीतून लबे करण्याचा विचार त्यावेळी माझ्या मनात डोकावून गेला होता पण चोरी करण्याइतके धैर्य अगात नसल्यामुळे मी तो विचार अमलात आणू शकलो नाही'

पुढे कॉलेजात गेल्यावर वाचन व पुस्तकांबद्दलचे खांडेकरांचे हे प्रेम पराकोटीला पोचले ते म्हणतात, ' त्या दिवसात पुस्तके वाचताना मला जेवणाखाणाची सुद्धा शुद्ध रहात नसे. इतकेच नव्हे तर आवडलेली पुस्तके संग्रहित करता यावीत म्हणून मी अन्नसत्याग्रह केलेला आहे. माझ्याजवळ ३० वर्षे असलेला सुंदर निळ्या पुठ्याचा शेरीडनच्या नाटकांचा संग्रह याचे उदाहरण होय. गडकऱ्यांनी मला स्कूल फॉर स्कॅन्डल हे नाटक मुद्दाम वाचायला सांगितले होते. त्याचे पुस्तक नेऊन मी ते वाचून काढले ते मला इतके आवडले की लगेच बाजारात शेरी-डनच्या सर्व नाटकांच्या संग्रहाची मी चौकशी केली एक रुपया चौदा आण्याला ते निळ्या पुठ्याचे सुंदर पुस्तक त्यावेळी मिळत असे. एवढी रक्कम महिन्याच्या खर्चातून सहज बाजूला काढणे त्यावेळी मला सर्वथैव अशक्य होते पण काही झाले तरी मला ते पुस्तक हवे होते. शेवटी ते मिळविण्याचा एक नवीन उपाय मी शोधून काढला. तीन चार दिवस खाणावळीत मी फक्त एकदाच जेवलो आणि शवटी रु १--१४ ची ती मोठी रक्कम पुरी करण्यासाठी एक दिवस निर्जळी एकादशी केली. आणि अशा रीतीने पैसे वाचवून मला आवडलेल ते पुस्तक मी खरेदी केले. ''

वाचनाच्या व्यसनाबाबतची खांडेकरांची ती आठवण माझ्या मित्रांना मोठी हृद्य वाटली. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, 'अरे हो, पद्मश्री नर्गिस यांच्याशी ज्यांचा विवाह झाला ते सुनील दत्त यांचीही एक आठवण अशीच आहे कॉलेजात असताना त्यांनी प्रथमच जेव्हा शेक्सपीयरचे ट्वेल्थनाईट हे नाटक वाचले तेव्हा त्यांना शेक्सपीयर इतका आवडला की त्यांनी लगोलग शेक्सपीयरची सगळी नाटके खरेदी करण्याचा निश्चय केला. पण त्यासाठी लागणारे पैसे आणणार कुठून ! त्यावेळी काही ते प्रख्यात

नट झालेले नव्हते अखेर त्या प्रयासासाठी हवे असलेले पैसे जमा करण्यासाठी त्यांनी ग्लाडकरांचीच युक्ती अमलात आणण्याचे ठरविले. आठवड्यातून एक दोन दिवस खाणावळीत एकदाच जेवण्याचे ठरवून, त्यामुळे होणाऱ्या बचतीतून त्यांनी आवश्यक ते पैसे जमा केले आणि शेक्सपीयरची सगळी नाटके खरेदी केली. पोटाला आच देऊन खरेदी केलेल्या त्या प्रयाचा रसास्वाद त्यांना अवर्णनीय वाटला असल्यास नवल नाही.'

'अगदी खर आह त,' मी म्हणतो, 'वाचनाची गोडी एकदा लागली की नवे पुस्तक दृष्टोत्पत्तीस येताच आपली स्थिति अगदी दारुड्यासारखी होते. केव्हा एकदा ते पुस्तक हाती यते व त्याचा फडशा पाडतो असे आपणास होऊन जाते याबाबत ग्लाडकरांचीच आणखी एक आठवण सांगण्यासारखी आह त पुण्या मुबईस गेले नि रस्त्याने जाताना वाटवर पुस्तकाचे दुकान दिसले की त्या दुकानात शिरण्याचा मोह त्याना अनावर होतो दुकानातील नवी, नवी असख्य पुस्तक त्यांना जणू आत बोलावतात खिशातल मर्यादित पैसे त्याना बजावून सागतात, "सावध हो, मोहाला बळी पडू नकोस" मनाचा निर्धार करून ते कसेबसे चार पावले पुढे जाण्याचा निकराचा निर्धार करतात पण लगेच त्याची पावल मागे वळतात एकदा तर नरीच औषध आणायला म्हणून त बाजारात निघाल होत खिशात फक्त पाच रुपयांची नोट होती पण त्या दिवशी ते घरी परत आल त एक नवा रशियन कथासग्रह घेऊन पत्नीने औषध कुठे आह म्हणून विचारले, तव्हा ते म्हणाल, 'पोटात उगीच औषधे कोंबण्यापेक्षा आधी निसर्गोपचार करून पाहण्याच मी ठरविल आहे' आणि त्या पुस्तकातील पान उघडून त पहिली गोष्ट वाचू लागले

'वाचनाचा नाद मोठाच अनखर असतो म्हण यचा तर!' बैठकीतील एखादा मित्र म्हणतो

'अवखळ तर खराच. तो एकदा जडला की पुस्तक दिसताच ते वाचण्याचा व विकत घेण्याचा मोह अनावर होतो. आणि वेळी पुस्तके खरेदी करण्यासाठी तो आपल्या खिशाकडेही दुर्लक्ष करतो. सुप्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ जदुनाथ सरकार याना विद्यार्थिदशेतच वाचनाचा मोठा विलक्षण नाद लागला होता. ते अतिशय हुशार विद्यार्थी असल्यामुळे त्याना दोन तीन शिष्यवृत्त्या मिळत असत आणि शिष्यवृत्त्यांचा सर्व पैसा ते पुस्तके खरीदण्यासाठी खर्चून टाकीत. कलकत्त्यातील जुन्या पुस्तकाची एकूण एक दुकाने त्यानी धुंडाळून काढली होती आणि आवडीची इतिहासाची पुस्तके खरेदी केली होती. शेवटी तर कलकत्त्यातील दुकानेही त्याना अपुरी पडू लागली. तेव्हा इंग्लडातील ल्युझॅक, ट्रॅबनेर, फ्रॅन्सीस एडवर्ड वगैरे दुर्मिळ पुस्तकांच्या दुकानातून त्यानी पुस्तके मागविण्याचा क्रम सुरू केला.'

'विनोबाजींचीही अशीच एक आठवण आहे' एक मित्र मध्येच म्हणाला, 'विनोबा वाचनाच्या बाबतीत मोठे छंदी होते. एखाद्या पुस्तकाचा काही भाग आवडला की तो ते एकसारखा वाचीत. इंग्रजी सहावीच्या परीक्षेत त्याना मराठीचे पेपरात १०० च्या वर गुण मिळाल्यामुळे बक्षीस मिळाले. बक्षिसाची ती रक्कम त्यानी कपड्यासाठी व इतर खाण्यापिण्यात न उडवता त्यातून संतसाहित्य विकत घेतले. मात्र या इतर वाचनाच्या सवयीमुळे त्यांचे अभ्यासावरील मन कमी कमी होत गेले. आणि एक वेळचा हा हुशार विद्यार्थी पुढे परीक्षेत पास होण्यापुरतेच गुण मिळवू लागला!' बैठकीतील सर्वजण ते ऐकून हसू लागले.

माझ्या मित्रांपैकी एकदा एकाने मला विचारले, 'तुम्ही वाचन कसं करता?'

नट झालेले नव्हत अखेर त्या प्रयासाठी हवे असलेले पैसे जमा करण्यासाठी त्यांनी खाडकरांचीच युक्ती अमलात आणण्याचे ठरविले आठवड्यातून एक दोन दिवस खाणावळीत एकदाच जेवण्याचे ठरवून, त्यामुळे होणाऱ्या बचतीतून त्यांनी आवश्यक ते पैसे जमा केले आणि शेक्सपीयरची सगळी नाटके खरेदी केली पोटाला आच देऊन खरेदी केलेल्या त्या प्रयाचा रसास्वाद त्यांना अवर्णनीय वाटला असल्यास नवल नाही '

'अगदी खर आहे त,' मा म्हणता, ' वाचनाची गाडी एकदा लागली की नव पुस्तक दृष्टोत्पत्तीस येताच आपली स्थिति अगदी दारुड्यासारखी होते कव्हा एकदा ते पुस्तक हाती येते व त्याचा फडशा पाडतो असे आपणास होऊन जाते यासंबंधात खाडकरांचाच आणखी एक आठवण सांगण्यासारखी आहे ते पुण्या मुबईस गेले नि रस्त्याने जाताना वाटेवर पुस्तकाचे दुकान दिसले की त्या दुकानात शिरण्याचा मोह त्यांना अनावर होतो दुकानातील नवी, नवी अमूल्य पुस्तके त्यांना जणू आत बोलावतात खिशातल्या मर्यादित पैसे त्यांना बजावून सांगतात, " सावध हो, मोहाला बळी पडू नकोस " मनाचा निर्धार करून ते कसेबसे चार पावले पुढे जाण्याचा निकराचा निर्धार करतात पण लगेच त्यांची पावले माग वळतात एकदा तर नरसाच औषध आणायला म्हणून ते बाजारात निघाले होते खिशात फक्त पाच रुपयांची नोट होती पण त्या दिवशी ते घरी परत आले ते एक नवा रशियन कथासंग्रह घेऊन पत्नीने औषध कुठे आहे म्हणून विचारले, तेव्हा ते म्हणाले, ' पाहात उगाच औषधे पोखरण्यापेक्षा आधी निसर्गोपचार करून पाहण्याचे मी ठरविले आहे ' आणि त्या पुस्तकातील पाने उलटून ते पहिली गोष्ट वाचू लागले

' वाचनाचा नाद मोठाच अजब असतो म्हणायचा तर ! ' बैठकीतील एखादा मित्र म्हणतो

' अवखळ तर स्वराच. तो एकदा जडला की पुस्तक दिसताच ते वाचण्याचा व विकत घेण्याचा मोह अनावर होतो. आणि वेळी पुस्तके खरेदी करण्यासाठी तो आपल्या खिशाकडेही दुर्लक्ष करतो. सुप्रसिद्ध इतिहासतज्ज्ञ जदुनाथ सरकार याना विद्यार्थिदशेतच वाचनाचा मोठा विलक्षण नाद लागला होता. ते अतिशय हुशार विद्यार्थी असल्यामुळे त्याना दोन तीन शिष्यवृत्त्या मिळत असत आणि शिष्यवृत्त्याचा सर्व पैसा ते पुस्तके खरीदण्यासाठी खर्चून टाकीत. कलकत्त्यातील जुन्या पुस्तकाची एकूण एक दुकाने त्यानी धुडाळून काढली होती आणि आवडीची इतिहासाची पुस्तके खरेदी केली होती. शेवटी तर कलकत्त्यातील दुकानेही त्याना अपुरी पडू लागली. तेव्हा इंग्लडातील ल्युझॅक, ट्रॅबनेर, फ्रॅन्सीस एडवर्ड वगैरे दुर्मिळ पुस्तकाच्या दुकानातून त्यानी पुस्तके मागविण्याचा क्रम सुरू केला. '

' विनोबाजींचीही अशीच एक आठवण आहे ' एक मित्र मध्येच म्हणाला, ' विनोबा वाचनाच्या बाबतीत मोठे दर्दी होते एखाद्या पुस्तकाचा काही भाग आवडला की तो ते एकसारखा वाचीत. इंग्रजी सहावीच्या परीक्षेत त्याना मराठीचे पेपरात १०० च्या वर गुण मिळाल्यामुळे बक्षीस मिळाले बक्षिसाची ती रक्कम त्यानी कपड्यासाठी व इतर खाण्यापिण्यात न उडवता त्यातून संतसाहित्य विकत घेतले. मात्र या इतर वाचनाच्या सवयीमुळे त्याचे अभ्यासावरील मन कमी कमी होत गेले आणि एक वेळचा हा हुशार विद्यार्थी पुढे परीक्षेत पास होण्यापुरतेच गुण मिळवू लागला ' ' बैठकीतील सर्वजण त ऐकून हसू लागले.

माझ्या मित्रांपैकी एकदा एकाने मला विचारले, ' तुम्ही वाचन कस करता ? '

मी त्याला म्हटल, ' वाचन मी नेहमी अधाशासारखा करीत असता एखाद नव पुस्तक हाती आल की ते कधी एकदा वाचून सपनतो अस मला होऊन जात वास्तविक ज्याला वाचनाचा खरा लाभ, आनद मिळवावयाचा असेल त्याने वाचन नेहमी मन पूर्वक केल पाहिजे पण याबाबत आपणास विद्यार्थिदशेत योग्य मार्गदर्शन मिळत नाही व त्यामुळे वाचनाबाबत आपणास तारतम्य ठवता यत नाही '

प्रोफसर चिं वि जोशी यानी आपण लहानपण अगदी बेफाट पण वळण नसलले वाचन केल्याचे मला सागितले त्याच वडील सुधारक पत्राच सपादक असल्यामुळे घरी वृत्तपत्रे, मासिके वगैर यत त्यामुळ त्याना वाचनाचा छद लागला व त्या झपाट्यात हाती पडतील ती पुस्तके त्यानी वाचून काढली औरगाबादी छबली, डॉ रामजाकृत स्त्रचारित्र असली पुस्तकसुद्धा आपण त्यावळी वाचून काढल्याचे त्याना सागतल रेल्वची वेळापत्रकेही ते त्यावेळी मोठ्या आवडीने वाचीत

योग्य मार्गदर्शनाच्या अभावा आपणापैकी बहुतेकाच्या वाचनाची स्थिति अशाच अस्ताव्यस्त असते असे अघळपघळ वाचन खग्गेगणती केल तरी तात्पुरत्या मनोरजनाशिवाय त्याचा इतर काही उपयोग हात नाही आपण केलल्या वाचनाचा आपल्या जीवनात काही उपयोग व्हावा अशी ज्याची इच्छा असेल त्यानी वाचन मन पूर्वक केले पाहिजे वाचनाच्या टिप्पणी अवश्य ठेवल्या पाहिजेत

या रानडे, चदावरकर, तेलग, खाटेकर, डा आबडकर इत्यादी व्यासगी विद्वानाच वाचनाच तत्र या दृष्टीने मोठे अनुकरणीय आह न्यायमूर्ती रानड हे प्रत्येक पुस्तक दोनदा वाचीत असत वाचलेल्या पुस्तकाची ते टिपणेही ठवीत इतके झाले की त पुस्तक हस्तगत झाले असे त्याना वाटे

खांडेकरांनी वाचलेले प्रत्येक पुस्तक, त्यांनी ते कसे वाचले असेल याची पूर्ण साक्ष देईल. त्यांनी वाचलेल्या प्रत्येक पुस्तकावर अनेक ठिकाणी खुणा, टीपा सापडतील. अनेकदा तर मूळ मजकुरापेक्षा त्यांची गिचमीड अक्षरेच अधिक दिसून येतील. हाती आलेले प्रत्येक नवीन पुस्तक पाठीचा कणा मोडून इतक्या चिकित्सकपणाने वाचणारा वाचक त्यांच्यासारखा दुसरा सहसा सापडणार नाही. पुस्तके विकत घेत बसायचे व ती वाचता, वाचता त्यावर खुणा करीत राहायचे हा त्यांचा नित्याचाच छंद.

डॉ. आंबेडकर वाचलेली व आवडलेली पुस्तके पुन्हा पुन्हा वाचीत असत. कुठल्याही विषयावर त्यांचे वाचन चालले असले तर ते त्या विषयावरील उलट-सुलट बाजूची पुस्तके वाचीत व वाचताना पुस्तकात ठिकठिकाणी खुणा करीत. एकाच वेळी ते कधी कधी अनेक पुस्तके वाचायला घेत, पण खुणा करण्यासाठी दरेक पुस्तकात एकेक पेन्सिल ठेवून देण्यास मात्र विसरत नसत.

या प्रसंगी विद्वानांच्या वाचण्याच्या पद्धतीवरून वाचन कसे करावे हे सहज ध्यानी येईल. मी माझ्या मित्रास म्हटले, ' केवळ पुस्तक वाचून संपवावयाचे म्हणून किंवा अमुक एक पुस्तक मी वाचले आहे हे मित्रास सांगता यावे म्हणून ते वाचण्यात काही अर्थ नाही. ते वाचताना त्याचा रसास्वाद मनसोक्त चाखीत वाचण्यातच खरी गंमत आहे. '

' पण हे असं वाचन करायला वेळ कुठं आहे ! ' तो मित्र म्हणाला. तोच कां ? बहुसंख्य लोकांची हीच तक्रार असते की वाचायला आम्हाला मुळीच वेळ नसतो. रोजच्या धकाधकीतच आमचा सगळा वेळ संपून जातो.

' पण ही तक्रार मला खरी वाटत नाही ! ' माझ्या मित्राला मी म्हटले, *' वाचायची इच्छाच असली तर वेळ निश्चित काढता येतो.* सर प्रफुल्लचंद्र रॉय यांची अशी एक गोष्ट सांगतात की वडिलांच्या ग्रंथसंग्रहालयातील असंख्य पुस्तके पाहून ही आपण कशी वाचू शकणार याचा त्याना संदेह पडला होता. पण त्यानी निश्चयाने व नियमितपणे वाचन सुरू केले. दिवसभरचा वेळ पुरेना म्हणून त्यानी मोठ्या पहाटेस उठण्यास सुरुवात केली. संग्रहणीचा विकार असल्यामुळे त्याना फार त्रास होई. तरीही वाचनाची अनिवार इच्छा व नियमित सवयी यांमुळे *त्याना वडिलांचा सर्व ग्रंथसंग्रह वाचून काढता आला.* '

दिवसभरच्या धकाधकीतूनही आपण मधून मधून काही क्षण वाचनासाठी काढू शकतो. आणि या क्षणांच्या हिशेबाने आपल्या वार्धक्यापर्यंतच्या कालावधीत आपण सुमारे हजार पुस्तकांचे वाचन सहजपणे करू शकतो. एवढ्या पुस्तकांच्या वाचनामुळे व्यवहारज्ञान व बहुश्रुतपणा आपणांस अगदी सहज साध्य होईल, नाही का !

• • •

प्रकरण चौथे

# वाचनाची कला

माझ्या एका मित्राला वाचनाची दांडगी हौस आहे. पुस्तके तो एकसारखी भराभर वाचीत असतो. एकदा मी त्याला म्हणालो, 'इतकी भाराभर पुस्तकें तू वाचतोस खरी, पण वाचन कसं करावें तें काही तुला कळत नाही.'

माझ्या त्या बोलण्याचा त्या मित्रास राग आला. तो जरा घुश्शातच म्हणाला, 'त्यात काय कळायचंय्? ग्रथालयात जाऊन मी हवी तेवढी पुस्तकें आणतो आणि मनसोक्त वाचतो. वाचनाची काही खास कला आहे असे मला तरी वाटत नाही.'

मी हसतच त्याला म्हटले, 'ग्रंथसंग्रहालय म्हणजे ज्ञानाचे भांडार होय हे मलाही मान्य आहे. पण या ज्ञानभांडाराची कवाडे खोलणारी किल्ली—गुरुकिल्लीच म्हण पाहिजे तर—आपणास अवगत असली तरच आपणास आपली ज्ञानलालसा पुरी करता येईल. थोर थोर ग्रंथकारांनी आपापल्या उत्तमोत्तम ग्रंथांतून व्यक्त केलेल्या विचाराशी, ही गुरुकिल्ली आपणास माहीत असली, तरच आपण तादात्म्य पावू शकू. असे तादात्म्य पावल्या-वाचून त्या ग्रंथकाराचे थोर विचार आपण आत्मसात करू शकणार नाही.'

माझा मित्र म्हणाला, ' मग सांग पाहू — ज्ञानभांडाराची कवाडे खोलणारी तुझी ही किल्ली काय आहे ती '

मी म्हटले, ' ही किल्ली हाताळायला मोठी कठीण आहे असे नाही तू हौसेने वाचतोसच त्या हौसेला जिज्ञासेची जोड दिलीस तर हेच तुझे वाचन अधिक मोलाचे होईल मला सांग पाहू, तू इतकी पुस्तके वाचतोस, पण ती वाचण्यापूर्वी किंवा वाचताना, ती लिहिणाऱ्या ग्रंथकाराबद्दल काही माहिती मिळवण्याचा तू प्रयत्न केलास का ? जी पुस्तके तुला आवडतात, ती लिहिणाऱ्या ग्रंथकाराबद्दल परिचय करून घेणे आवश्यक आहे असे तुला वाटले का ? '

माझा मित्र गांगरलाच तो म्हणाला, ' थोर थोर ग्रंथकाराचा परिचय माझ्यासारख्या साध्या वाचकाला कसा होईल बरं ! '

मी म्हटले, ' परिचय म्हणजे प्रत्यक्ष ओळख नव्हे तरी प्रत्येक ग्रंथकाराची ओळख करून घेणे कुणालाच शक्य होणार नाही पण आपण वाचीत असलेल्या त्याच पुस्तकाद्वारे आपणास त्या ग्रंथकाराची अधिक ओळख करून घेता येणे शक्य आहे '

माझा मित्र मजकडे पाहात राहिला तो कशी काय ? हेच विचारण्याचे त्याचे मानस असावे

एखादे पुस्तक आपण वाचावयास घेतले की त्याचे नावाचे पान आपण प्रथम उघडून पाहतो किंवा पाहिले पाहिजे त्या पानाच्या मागील बाजूस दिलेल्या यादीवरून त्या ग्रंथकाराने आणखी कुठली पुस्तके लिहिली आहेत ते कळून येते त्याची नोंद करून मागे-पुढे ती पुस्तके आणून, त्या ग्रंथकाराशी झालेला परिचय वाढवता येतो त्याची मत, मूल्य आपणास अभ्यासता येतात पुस्तकाच्या नावाच्या पानावर खाली प्रकाशकाच्या नावाची नोंद असते त्या नावावरून

प्रकाशन संस्थेची आणखीही पुस्तके आपण आणून वाचू शकतो. चांगले प्रकाशक, दर्जेदार ग्रंथच प्रकाशित करीत असल्यामुळे, विनासायास आपणांस अशा पुस्तकाची यादी, आपण वाचीत असलेल्या पुस्तकाच्या मुखपृष्ठाच्या आतील बाजूस सापडते.

नावाच्या पृष्ठानंतर, पुस्तकाच्या प्रस्तावनेवरून नजर टाकणे खरोखर आवश्यक असते. प्रस्तावनेवरूनच त्या लेखकाने पुस्तक का लिहिले (म्हणजे ते लिहिण्याचा त्याचा उद्देश) ते कळून येते. पुस्तक लिहिण्याचा लेखकाचा उद्देश आपणांस अगोदरच ठाऊक झाला, तर त्या पुस्तकाशी आपण अधिक लौकर समरस होणार नाही का?

प्रस्तावना पुस्तकाच्या प्रारंभी छापलेली असते. पण ती बहुधा पुस्तकाच्या नंतर म्हणजे पुस्तक लिहून झाल्यावर लिहिली असण्याचा खूपच संभव असतो. पण लेखकाचा मानस मात्र, वाचकांनी ती अगोदर वाचावी असा असतो. प्रस्तावना ही पुस्तकाचे प्रवेशद्वारच होय. वाचक या प्रवेशद्वारातून, पुस्तकाच्या गाभाऱ्यात डोकावत असतो आणि तो तसा डोकावत असताना त्याला काही हृद्गत सागण्याचा ग्रंथकाराचा हेतू असतो आणि म्हणूनच प्रस्तावनेची पाने न वाचताच उलटणे हे चांगल्या अभिरुचीचे लक्षण तर ठरत नाहीच, पण ते हिताचेही नसते.

मी वाचावयास घेतलेल्या प्रत्येक नव्या पुस्तकाचा कर्ता हा मला लाभणारा एक नवा मित्रच आहे असे मला नेहमी वाटते. त्याने लिहिलेली पुस्तके मी पूर्वी वाचलेली असल्यास मला माझ्या एखाद्या जुन्या मित्रास भेटल्यासारखे वाटते आणि मागील भेटीत त्याने जे ऐकवले, तेव्हापासूनच्या पुढील काळात, त्याने जे काही नवे ऐकले, अभ्यासले, अनुभवले, परिशीलन केले, ते ते या नव्या पुस्तकात मला वाचावयास मिळणार या कल्पनेने मला अगणित आनंद वाटतो.

मी माझ्या मित्रास म्हटले, 'माझी वाचनाची एक पद्धतच ठरून गेली आहे. प्रस्तावनेच्या प्रवेशद्वारातून, ग्रंथाच्या गाभाऱ्यात मी जसजशी पावले टाकू लागतो, तसतसे माझ्या मनावर परिणाम करणारे परिच्छेद वाचनात आले तर त्यावर खुणा करून ठेवण्यास मी विसरत नाही. पुस्तक वाचून पूर्ण झाले की खुणा करून ठेवलेले हे परिच्छेद मी पुन्हा वाचतो आणि माझा वाचनाचा आनंद द्विगुणित झाल्यावाचून राहात नाही. पुस्तक एकदा वाचणे म्हणजे त्याचा नुसता परिचय करून घेणे होय पुन्हा पुन्हा वाचणे म्हणजे त्यातील मजकुराशी मैत्रीच करून घेण्यासारखे होय '

'वाचता वाचताच, वाचलेल्या मजकुरावर विचार करणे बरे. त्यामुळे आपल्या बुद्धीला, कल्पनाशक्तीला चालना मिळते किंवा धक्के तरी बसतात आपल्या मताच्या पुष्टीसाठी लेखकाने जे जे मुद्दे मांडले असतील, त्याची छाननी करणेसुद्धा बरे. कदाचित ती मते व माहिती चुकीचीही असू शकेल प्रत्येक छापील अक्षर खरे असतेच असे नव्हे '

'मी ज्या ज्या वेळी एखादे पुस्तक वाचायला घेतो, त्यावेळी ते वाचीत असताना माझ्या मनात अनेक प्रश्न उभे राहतात 'मी हे पुस्तक का वाचतो आहे?' 'ते लिहिण्यात लेखकाचा काय हेतू आहे?' 'त्याने त्यात काय सांगण्याचा प्रयत्न केला आहे व पुष्टीसाठी काय मते मांडली आहेत.' 'ही मते मला पटतात का?' 'नाहीत ' 'का नाहीत,' असे अनेक प्रश्न माझ्या मनात उभे राहतात '

'वाचनाची सवय अशी चिकित्सकाची असावी नाहीतर भाराभर वाचूनही त्याचा फारसा उपयोग होत नाही. एका पाठोपाठ एक पुस्तक वाचून संपवण्याचा शौक अनेकांना असतो. तुम्ही तो तसा आहे म्हणा. पण आजवर तू जे वाचलेस, त्यातून काय मिळवलेस सांग पाहू!'

माझा मित्र गागरलाच. तो म्हणाला, 'माझ जाऊ दे. मी आपला वेळ घालविण्याचे साधन म्हणूनच वाचीत असतो.'

मी हसलो नि म्हणालो, 'मला एक आठवण आलीय. चक्रवर्ति राजगोपालाचारींची बंदिशाळेतील दैनंदिनी मी एकदा वाचीत होतो. तीत एके ठिकाणी राजाजींनी म्हटले आहे की केवळ करमणुकीसाठी वाचन करणे म्हणजे कालापव्यय करण्यासारखे आहे. प्रसिद्ध ब्रिटिश लेखिका मोनिका फेल्टन हिने राजाजींना याबाबत एकदा म्हटले, 'आपण करमणुकीसाठी जे वाचतो, त्याचा कधी काळी आपणास उपयोग होणारच नाही, असे कसे म्हणता येईल?'

राजाजी म्हणाले, 'समज, तू रस्त्याने जात आहेस. रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या दुकानातून खूप नव्या नव्या वस्तू मांडून ठेवलेल्य आहेत. त्यांतील काही वस्तू पुढे कधी काळी उपयोगास येतील म्हणून खरेदी करून खिशात कोंबीत चाललीस तर काय होईल बर! त्या वस्तू उपयोगास येतील की नाही याबद्दल तर खात्री नाहीच पण सध्या तुझे खिसे मात्र त्या कोंबल्यामुळे फाटून जातील.' पुस्तकांचेही तसेच आहे. भाराभर पुस्तके वाचून काढल्यामुळे एखाद्याचा फायदा होईलच असे नाही. राजाजींचे हे म्हणणे तुला पटत नाही?'

भाराभर वाचनापेक्षा, एकाग्रतेने, समजूतदारपणे काहीतरी पद्धत ठरवून केलेले खरे वाचन हेच उपयुक्त वाचन होय. राजाजींनी या दैनंदिनीतच एके ठिकाणी सांगितले आहे की, एकेक पुस्तक वाचून संपवायला मला कित्येकदा आठवड्याच्या आठवडे पुरत नाहीत. मननपूर्वक, समजूतदारपणे केलेल्या वाचनामुळे वाचलेल्या पुस्तकाचे मूल्यमापन आपण करू शकतो. पुस्तके ही त्या त्या लेखकाच्या बुद्धिविकासाची प्रतीकेच होत. किंबहुना पुस्तके ही त्याची बौद्धिक अपत्येच होत. म्हणूनच पुस्तकांचे

मूल्यमापन जणू काय ती बोलती-चालती माणसेच आहेत असे धरून आपण कसोशीने करायला हवे

( पुस्तके आपणास शिकवतात, रजवितात, हासवितात, गुदगुल्या करतात, विचार करायला लावतात, कान पिचक्या देतात आणि कधी कधी रडायलाही लावतात पुस्तके म्हणूनच व्यक्तीप्रमाणेच सर्रागुरी जिवत वाटतात )

अर्थातच काही पुस्तके याला अपवाद असतात, नाही अस नाही आणि म्हणूनच सुबुद्ध वाचक वाचनासाठी पुस्तक निवडून घेत असतो.

वाचनासाठी मी पुस्तके निवडून घेत असलो तरी त्यापैकी प्रत्येक पुस्तक काही मी अथपासून इतिपर्यंत वाचतोच असे नाही बहुतेक पुस्तके मी अधून मधून चाळतो व सोडून देतो वाचनाची सवय ही आता माझ्या खाण्याच्या सवयीसारखी झाली आहे लहानपणी मी जरताना अगर मित्राबरोबर हॉटेलात गेलो की वाटेल तो पदार्थ चापीत असे मग तो आवडीचा असो अगर नसो माझ्या वाचनाचेही तसेच असे ज म्हणून पुस्तक हाती लागे ते मी ओरपून काढी पण जसजसा मी वयाने वाढू लागलो, तसतशा खाण्यापिण्याच्या माझ्या आवडी बदलल्या न आवड णाऱ्या वस्तू मित्राच्या आग्रहास्तव मी खाईनासा झालो म झ्या वाच नाचही तसेच झाले हाती आलेले प्रत्येक पुस्तक मी व चीनासा झालो आता पुस्तके चाळून त्यातील मनाची पकड घणारे एखादे दुसरे पुस्तक सपूर्ण वाचण्याकडे माझी प्रवृत्ती होऊ लागली या बाबतीत मी डॉक्टर जॉसन याचा पक्का अनुयायी आहे डॉक्टर जॉन्सन म्हणत, की मी कुठलेच पुस्तक सपूर्णपणे कधीच वाचीत नाही, तर ते अधून मधून चाळतो व त्यातले जे काही चागले वाटल ते टिपतो

वाचनाबद्दलची अशी नीर क्षीर प्रवृत्ती वाचकाच्या मनात वाढू लागते, त्याचे कारण आळस अगर अक्षमता हेच असते असे नव्हे. वाचनासाठी उपलब्ध असणारा ग्रंथाचा प्रचंड डोंगर पाहूनच, हा सर्व ग्रंथसंभार आपण वाचू शकणार नाही याबद्दल त्याची खात्री होते. आणि मग त्यातील उत्तमोत्तम व निवडक ग्रंथांचेच वाचन करण्याकडे त्याची प्रवृत्ती होते.

माझ्या लहानपणी वाचनाच्या बाबतीत मला तसे मार्गदर्शन कुणाचेच मिळाले नाही. इंग्रजी शाळेत असताना गोगटे नावाचे एक शिक्षक आम्हाला मराठी शिकवीत. ते कधीमधी आम्हाला चांगल्या चांगल्या पुस्तकांची माहिती सांगत व ती पुस्तके वाचण्याची शिफारस करीत. त्यांचा स्वत:चा तर वाचनाबद्दलचा कार्यक्रम आखलेला असे. तीन महिने किंवा सहा महिन्यांचा कालखंड पाडून ते एकेका विषयावरील पुस्तके वाचीत. एका तिमाहीत इतिहास तर दुसऱ्या तिमाहीत तत्त्वज्ञान, तिसऱ्या तिमाहीत चरित्र, तर चौथ्या तिमाहीत प्रवास, असे ते विषयवार वाचन करीत. यामुळे प्रत्येक विषयावरील साधक बाधक प्रश्नांची छाननी होऊन ते ते विषय आपणास चांगलेच परिचित होत जातात असे ते म्हणत. गुरुजींच्या त्या पद्धतीने वाचण्याचा मी काही दिवस प्रयत्न केला होता. पण ते काही आपल्या प्रवृत्तीला मानवले नाही. साजूक लोणकढ तूप घातलेला वरण-भात कितीही रुचकर असला तरी महिनेच्या महिने तोच तो कोणी सारखा खाववत नाही. तसेच त्याच त्या विषयावरील पुस्तकेही एकसारखी काही आपण वाचू शकणार नाही. जेवणाच्या पदार्थांत अनेकविधता व वैचित्र्य असल्यास जशी जेवणाची गोडी वाढते तशीच वाचनातही विविधता असेल तर रजकता वाढते.

पण निरनिराळ्या विषयावरील अशी विविध पुस्तके शोधून काढणे किंवा त्यांची माहिती मिळवणे ही काही साधी गोष्ट नाही. ती पण

एक कलाच आहे. यासाठी एक तर वृत्तपत्रातून येणारी पुस्तक परीक्षणे किंवा अभिप्राय सतत वाचले पाहिजेत; किंवा दरमहा ग्रंथालयात येणारी नवी पुस्तके, पाहण्यासाठी प्रदर्शित करण्यात येतात, तेव्हा ती चाळून पटताळून पाहायला हवीत पण हे झाले नव्याने प्रकाशात येणाऱ्या पुस्तकाबद्दल. जुन्या पुस्तकातही अनेक वाचनीय व अभ्यसनीय पुस्तके असू शकतात की ! त्याची माहिती आपणास कशी उपलब्ध होणार ! त्यावर काही आता पुन्हा परीक्षणे येणार नाहीत.

अशा पुस्तकाची माहिती होण्याचे एक साधन म्हणजे वाचनाची आवड असणाऱ्या मित्राशी, गुरुजनांशी, अगर जाणत्या माणसाशी पुस्तकाबद्दलच्या गप्पा मारणे हे होय अशा चर्चा संवादातून अनेकदा आपल्या दृष्टिपथातून सुटलेल्या अनेक चांगल्या पुस्तकांची माहिती मिळू शकते. वाचनाची ज्यांना खरोखरच गोडी असते, अशी जाणती माणसे नेहमीच चांगल्या पुस्तकांची थोरवी आपल्या मित्रपरिवारास सांगत असतात. आपण उपभोगिलेल्या आनंदाचा तसाच आस्वाद इतरांनीही घ्यावा अशीच त्यांची इच्छा असते

राजाजींचे व्यक्तिचित्र लिहिणाऱ्या मोनिका फेल्टन एकदा राजाजींना भेटायला गेल्या राजाजी त्यावेळी एक पुस्तक चाळीत होते मोनिका आत आल्याबरोबर राजाजी त्यांना पाहून एकदम उद्‌गारले, 'हे बघ एक फारच छान पुस्तक ! हे तू वाचलेच पाहिजेस '

मोनिका दु खद स्वरात म्हणाल्या, 'पण काय उपयोग ! तुम्ही परवाच मला म्हणाला होतात, मी तुला पुस्तक म्हणून उसने देणार नाही.'

'अर्थातच,' राजाजी म्हणाले, 'तू ते कधीच परत करीत नाहीस तूच कशाला, वाचायला नेलेले पुस्तक परत करण्याची तसदी आज-काल मुळी कुणी घेतच नाही.' आणि नंतर आठवल्यासारखे करून ते

म्हणाले, 'तुला केंब्रिजच्या त्या प्रोफेसरांची गोष्ट ठाऊक आहे का? ते एकदा घरी आलेल्या पाहुण्यांना आपला ग्रंथसग्रह दाखवीत होते. ते म्हणाले, 'आपल्या सग्रहातील पुस्तके कुणालाही वाचायला द्यायची नाहीत असा मी मुळी नियमच केला आहे. अहो, नेलेली पुस्तके मुळी कधी कुणी परतच करीत नाहीत!'

पाहुण्यापैकी एकाने प्रोफेसरास विचारले, 'पण ज्या अर्थी तुम्ही कुणाला पुस्तके देत नसता, त्या अर्थी लोक ती परत देत नाहीत हे कशावरून तुम्ही म्हणता?'

प्रोफेसरसाहेब आपल्या कपाटातील पुस्तकाच्या रागाकडे बोट दाखवीत म्हणाले, 'का, या कपाटातील ही पुस्तकेच याचा पुरावा देतील की! वाचावयास आणून परत न केलेली तर ही सारी पुस्तके आहेत.'

राजाजी खो खो हासत सुटले. ते म्हणाले, 'आता साग पाहू – मी हे पुस्तक तुला कसे देऊ ते!'

आमचे लहानपणचे ते गुरुजी मला नेहमी म्हणत, 'वाचन हे डोळ्यानी करायचे नसते; तर ते खरे मेंदूने करायचे असते.'

राजाजींचे वर उल्लेखिलेले व्यक्तिचित्र वाचीत असताना, त्यांनी एके ठिकाणी अगदी तेच उद्गार काढल्याचे मी अलीकडे वाचले; आणि लहानपणच्या आमच्या त्या गुरुजींची मला आठवण झाली. राजाजी आजारी होऊन रुग्णालयात पडले होते. त्याच्या खाटेच्या वाजूला छोट्या टेबलावर पुस्तकाची रासची रास पडली होती. त्याना भेटावयास आलेल्या आप्तेष्टापैकी एका बाईंनी म्हटले, 'असं सतत वाचन करून, तुम्ही या आजारात आपल्या डोळ्यावर आणखी ताण आणीत आहात नाही का?'

' ताण ? ' राजाजी उद्गारले, '—अहो वाचनामुळे माझे डोळे जाण्याचीच पाळी आली आहे माझ्या डोळ्यात सरल्या आल्या आहेत पण खरच सागतो मी, माणूस आपल्या डोळ्यापेक्षा मेंदूनेच जास्त वाचन करतो. आणि मेंदू, डोळ्याच्या खरल्याची फारशी फिकीर करीत नाही '

आणि मेंदूने वाचलेली ( म्हणजेच समजूतदारपण, मननशीलपणे वाचलेली ) पुस्तके हीच आपल्या विचारसपन्नतेला स्वत हातभार लावतात. मात्र मेंदूने वाचावीत अशा पुस्तकाची सख्या फार थाडी असते. पुस्तकाच प्रकार अनेक असू शकतात. काही पुस्तके मनोरजन करतात, वेळ घालविण्याचे ती पुस्तके म्हणजे उत्कृष्ट साधन असते. ती वाचताना आपल्या मानसिक अगर शारीरिक उत्साहाची मुळीच झीज होत नाही आपल्या आजारीपणात अगर थकल्याभागल्या वेळी अशी पुस्तक दिलासा देऊ शकतात पडित नेहरूच्याबद्दल असं सागतात की, ते थकले की गादीवर लवडत आणि एखादे पुस्तक वाचू लागत वाचनात गर्क होऊन लौकरच ते निद्राधीन हात असत.

दुसरी काही पुस्तके अशी असतात की, ती आपण हातात घेतो, चाळतो, त्यातील काही विचार आपणास आवडतात, आपण ते मनात टिपून ठेवता या उलट काही पुस्तके अशी असतात की ती समजूत दारपणे, सावकाशीने, पुन पुन्हा वाचण इष्ट असते

पतप्रधान लालबहादूर शास्त्री हे तरुणपणी वाचनाचे व पुस्तकांचे मोठे शौकीन होते हाती लागेल ते पुस्तक वाचल्याशिवाय ते सहसा सोडीत नसत पण त्यातील काही पुस्तके मात्र पुन्हा सावकाशीने, समजूतदारपणे व मन पूर्वक वाचायची अशी ते मनाशी खूणगाठ बाधून ठेवीत त्याच्या राष्ट्रसेवच्या कार्यात त्याना त्यासाठी पुरसत कशी ती

मिळतच नसे. म्हणून ज्या ज्या वेळी त्याना तुरुगवास घडे त्या त्या वेळी ते आठवणीने ती पुस्तके मागवून घेत असत आणि ती मननपूर्वक वाचून काढीत. आपल्या तुरुगवासाच्या अवधीत त्यानी कॅट आणि हेगेल, हॅरॉल्ड लास्की, बर्ट्रांड रसेल आणि हक्स्ले यासारख्या तत्त्वज्ञान्याचे ग्रथ सावकाशीने वाचून काढले.

मात्र मननपूर्वक व चिकित्सक वृत्तीने करायच्या वाचनासाठी पहिली आवश्यक गोष्ट म्हणजे मन लावण्यास, एकाग्र करण्यास शिकले पाहिजे. ससाराच्या रोजच्या धकाधकीत वाचनासाठी किंवा ग्रथाचा आस्वाद घेण्यासाठी आपणास फारसा वेळ मिळतोच असे नाही. त्यातूनच मिळालेल्या काही क्षणाचा विनियोग आपण चागल्या रीतीने एकाग्रपणे केला पाहिजे. ससारातील इतर भानगडी, चिंता, विवचना, दु ख आणि दुखणी, पुस्तके हाती घेतल्यानतर आपण विसरून जायला हवे मला इथे वि. स. खाडेकराची आठवण येते. त्याची प्रकृती नेहमीच तोळामासा. मात्र दुखण्यानी नेहमीच त्रासलेले असले तरी एखाद्या ग्रथाच्या गाभाऱ्यात त्याचे मन एकदा शिरले की आजाराचे दु ख ते तत्काळ विसरून जात. एकदा पोटाच्या व्यथेने ते अगदीच कावले होते. डॉक्टरानी एक दोन पेटट औषध लिहून दिली होती. पण ती घेण्याचा त्याना कटाळा आला होता. राज उठून औषधे तरी किती घ्यायची ! पण औषधे आणण्याबद्दल पत्नीने सारखा मागे लकडा लावल्यामुळे अखेर ते कपडे करून घराबाहेर पडले खिशात एकच दहा रुपयाची नोट होती औषध-विक्रेत्याकडे जाताना अर्ध्या वाटेवर असलेल्या पुस्तकाच्या दुकानात नेहमीप्रमाण त्यानी नजर टाकली. तेथे आलेल्या दोन नव्या पुस्तकाकडे त्याचे लक्ष गेले. त्यातील एक उचलून त्यानी चाळायला सुरुवात केली आणि थोड्याच वेळात ते

त्यात समरस होऊन गेले. खिशातील दहा रुपयाची नोट काढून त्यांनी दुकानदारास पैसे दिले व पुस्तक घरी आणून ते वाचण्यात गढून गेले. पत्नीने विचारले, ' अहो, औषध आणलेत का ? ' ते उद्गारले, ' हू. आणू या. आणू या. ' पत्नीने जाणले की औषधासाठी जाऊन ते पुस्तक घेऊन परत आलेत. पोटाची व्यथा भाऊसाहेब त्या पुस्तकाच्या वाचनात केव्हाच विसरून गेले होते.

पण खाडेकराची ही एकाग्रता सगळ्यानाच साधेल आणि ग्रंथांचा रसास्वाद इतक्या तन्मयतेने, समरसतेने सगळ्यानाच घेता येईल असे नाही. पण सरावाने हे साधत जाते. याचसाठी आपले चित्त वेधून घेणारा पुस्तकातील भाग अधोरेखित किंवा समास रेखांकित करून ठेवण्याची मी वर सूचना केलेली आहे. अशा अधोरेखितामुळे त्या त्या ग्रंथाचा आस्वाद आपणास पुन्हा पुन्हा आणि जास्त समरसतेने घेता येतो. टिळक, चंदावरकर, रानडे, गडकरी वगैरेसारखे थोर विद्वान याच पद्धतीने वाचन करीत व प्रत्येक पुस्तकाचा आस्वाद घेत.

पण पुष्कळ लोकाना, पुस्तकात अशा तऱ्हेने खुणा करणे, रेषा मारणे, टीका टिप्पणी लिहिणे आवडत नाही. त्यामुळ पुस्तकाचे सौंदर्य नष्ट होते, ती घाणेरडी दिसतात असे त्याचे म्हणणे ! सौंदर्य, शास्त्राच्याच दृष्टीने पाहिले तर ते कदाचित खरे असेल पण अभ्यासकाच्या दृष्टीने, महत्त्वाच्या भागाखाली रेखा मारणे, किंवा काढेला टिपणे लिहिणे हे फार महत्त्वाचे असते. त्यामुळे त्या विशिष्ट मजकुराकडे आपले लक्ष वारवार केंद्रित होते. तो मजकूर आपल्या आठवणीत राहण्यास साहाय्य होते अशा टिपणाच्या अधोरेखिताचा पुढे दैनंदिन जीवनात आपणास अनेकदा उपयोग होऊ शकतो. एखादा निबंध लिहिताना, भाषण तयार करताना अगर वर्गात शिकवताना अशा

टिपणाचा चांगला उपयोग झाल्याचे अनेक लोकांच्या अनुभवास येत असेल.

मी स्वतः पुस्तके वाचताना अशा खुणा भरमसाट करतो. एवढेच नव्हे तर, वाचताना जिथे जिथे एखाद्या विशिष्ट विषयाबद्दल काही नवा उल्लेख आला असेल तिथे मी त्याची विषयवारी टिपून ठेवतो. उदाहरणार्थ, पुस्तकात कुठे प्रेम, सत्य, यश, प्रयत्न, कला वगैरेंबद्दल काही उल्लेख अगर माहिती असेल तर तिथेच बाजूला मी त्या विषयाची नोंद करतो. अनेक विद्वानांच्या वाचनाच्या पद्धतींचे जे उल्लेख मी मधून मधून या पुस्तकात केले आहेत, ते या माझ्या पद्धतीमुळेच मला शक्य झाले.

पण पुस्तकातून खुणा करायच्या म्हटले तर पुस्तके आपणास स्वतःच खरेदी करायला हवीत. पुस्तके विकत घेण्याची स्वतःला सवय लावून घ्यायला हवी. दुसऱ्याकडून वाचावयास आणलेल्या पुस्तकात अशा टीपा-टिप्पणी काही आपण करू शकत नाही. आणि केल्यास त्याचा आपणास काही उपयोगही होत नाही.

मित्राकडून अगर वाचनालयातून वाचावयास आणलेली पुस्तके ही आपल्याकडे आलेल्या पाहुण्यासारखी मला वाटतात. शिष्टाचाराच्या सगळ्या मर्यादा पाळून त्यांना सांभाळावे लागते. त्यांना काही नुकसान पोचणार नाही, त्यांची पाने फाटणार नाहीत, याबद्दल काळजी घ्यावी लागते. त्यावर रेषा, खुणा करता येत नाहीत त्यांच्या पानांचे कोपरे दुमडता येत नाहीत. ती इकडे तिकडे टाकता येत नाहीत आणि इतके करून सुद्धा ती कधी ना कधी परत करावी लागतातच. (फारच थोडे लोक ती परत करतात!) तीच जर पुस्तके तुम्ही खरेदी केलेली असली तर ती स्वाभाविकच तुम्हाला अधिक आवडतात त्यावर खुणा करण्यास, रेषा मारण्यास तुम्हाला काहीच हरकत वाटणार नाही.

ती टेबलावर, अंथरुणावर, कुठेही टाकून ठेवायला तुम्हाला भीती वाटणार नाही. वाटेल तेव्हा उचलून ती वाचता येतात, चाळता येतात.

पण माझ्या पुष्कळशा मित्राना पुस्तके विकत घेण्याची कल्पनाच मुळी पटत नाही. एकदा वाचून झाले की, मग त्या पुस्तकाचा काय उपयोग ! ते खरेदी करण्यात आपले पैसे वाया गेल्यासारखे त्याना वाटते. पण हेच माझे मित्र तीन, चार रुपयाचे सिनेमाचे अगर नाटकाचे तिकीट खरेदी करण्यास मुळीच मागेपुढे पाहात नाहीत सिनेमा पाहून झाल्यावर ते पैसे फुकट गेल्यासारखे नाही का होत, असे मी कधी कधी त्याना उलट विचारतो. पुस्तक समग्री तरी राहते आणि आयुष्यभर ते आपली सोबत करते, आपल्या मनाचा उत्साह आणि आनद पुन्हा पुन्हा द्विगुणित करीत असते

घरातला माझा बहुतेक वेळ मी पुस्तकाच्या सगतीत घालवतो. रात्री झोपताना सुद्धा उशाजवळ मी एखादे दुसरे पुस्तक ठेवलेले असते. माझ्या मते निद्रानाशावर वाचनाइतके दुसरे परिणामकारक औषध नसेल. पुस्तकाच्या सगतीत घालविलेला हा वेळ मला जिवलग मित्राच्या सहवासात घालवल्यासारखा वाटतो.

आणि म्हणूनच माझ्या या जिवलग स्नेह्याच्या सगतीत मला सर्वकाळ राहता यावे म्हणून मी पुस्तके खरेदी करीत असतो आणि वाचीत असतो धकाधकीच्या जीवनात धक्के मिळाले की मी पुस्तकाकडे वळतो. तेथेच मला नवी प्रेरणा मिळते.

• • •

प्रकरण पाचवे

# वाळूतील सुवर्णकण

" मराठी पुस्तके खपत नाहीत, विकली जात नाहीत असा साधारण समज आहे. असे असताना आपण या व्यवहारात कसे काय आलात ? आणि आपण तर जुनीच पुस्तके विकता म्हणे ! "

" होय ", ढमढेरे म्हणाले, " नवीन पुस्तके खपत नाहीत असा माझाही अनुभव आहे. सुरुवातीला मी पुस्तकप्रकाशनाचाच धंदा सुरू केला होता 'खोगीरभरती' हे पु ल चे पुस्तक मी काढलेले आहे रामानंद सागर यांचे ' आणि माणसाचा मुडदा पडला, ' हे पुस्तकही मी काढले होते ' नाना जोग ' हे लेखक मराठीला मीच मिळवून दिले म्हणाना पण मराठी पुस्तके खपत नाहीत, हे आढळून यायला मला फारसा वेळ लागला नाही. प्रकाशनाचा व्यवसाय मी लागलीच आवरता घेतला.

' जुन्या ग्रंथांची आवड मला पूर्वीपासूनच होती स्वत वाचण्या साठी म्हणून लहानपणापासून मी बरीच जुनी पुस्तके गोळा केली होती. प्रकाशनाचा धंदा चालेना म्हणून हीच जुनी पुस्तके विकायला मी सुरुवात केली, आणि मला आढळून आले की, नवी पुस्तके खपत नसली, तरी जुनी पुस्तके खपतात. जुनी पुस्तके थोडी असतात ती क्वचितच

उपलब्ध होतात, आणि अभ्यासूना जरूर लागली की त्याची किंमत चागली येऊ शकते.

" सुमारे सोळा वर्षांपूर्वी म्हणजे १९५१ साली मी हा धदा सुरू केला जर मी चार-पाच वर्षें अगोदर या धद्यात पडलो असतो तर या वेळी मी मोठा श्रीमत माणूस असतो "

" ते कसे काय ? चार वर्षांत असा काय फरक पडला असता ? " मी चौकसपणे विचारले

" ४७ साली आपणास स्वातत्र्य मिळाले, आणि येथील सर्व युरोपियन लष्कर स्वदेशी परत गेले या सैनिकाचे पुण्यात अनेक क्लब होते. प्रत्येक क्लबचे एक ग्रथालय असे या ग्रथालयातून अफाट ग्रथसपत्ती होती लष्करातील मोठमोठ्या अधिकाऱ्यानी आपल्या उपयोगाकरिता मागविलेले अनेक दुर्मिळ ग्रथ त्यात होते हे सर्व ग्रथ त्यानी, जाताना, येईल त्या किमतीने फुकून टाकले आणि या परिसरातील रद्दीवाल्यानी ते हस्तगत करून त्याचा पैसा केला केवळ चार वर्षें उशिरा या धद्यात आल्यामुळे माझी ती सधी हुकली ती पुस्तके मला हस्तगत करता आली असती तर आज मी श्रीमत झालो असतो

" या व्यवसायात शिरल्यानतर सुरुवातीची माझी ४।५ वर्षे तर केवळ जुनी पुस्तके जमविण्यातच गेली "

" पण असली जुनी पुस्तके तुम्ही कोठून मिळवता ? नव्या पुस्तकाप्रमाणे त्याची काही खरेदीविक्रीची केंद्रे नाहीत, काही नाही "

" छे, छे ! जुनी पुस्तके मिळविण्याचे आमचे उत्तम स्थान म्हणजे रद्दीवाले गावातल्या रद्दीवाल्याच्या रद्दीतूनच जुन्या पुस्तकाची रत्न निपजत असतात गावागावातून अनेक लहानमोठे रद्दीवाले कागदाचा

रद्दी जमवीत घरोघर हिंडत असतात. त्यांनी जमविलेली रद्दी नंतर घाऊक व्यापारी खरेदी करतात, आणि नंतर ती रद्दी वेचून त्यात सापडणारी निवडक पुस्तकें, ग्रंथ, जुनी वाडे वेगळी काढून ते व्यापारी त्याचा लिलाव करतात; किंवा ती सगळी रद्दी ते निरनिराळ्या कागद कारखान्याकडे पाठवून देतात. येथे जवळच मुंढव्याला कागद कारखाना असल्यामुळे अनेक वेळा लॉर्‍या भरभरून येथे रद्दी येत असते. ही रद्दी धुंडाळताना त्यांतून कित्येक मौल्यवान ग्रंथ माझ्या हाती लागले आहेत.

" आता येथील बहुतेक रद्दीवाले माझ्या परिचयाचे झाले असल्यामुळे, मी येऊन त्यांची रद्दी पाहीपर्यंत ते ती विकीतच नाहीत. ते निरोप पाठवतात. 'तात्या, नवा लॉट आलाय्. बघायचा का तुम्हाला?' मी जाऊन पुस्तकांचा तो ढिगारा लागलीच उपसून पाहतो आणि मला कधीकधी त्या कचरावजा कागदातून काही ना काही मौलिक ग्रंथ, अगर हस्तलिखित उपलब्ध होत असत.

" जुनी दुर्मिळ पुस्तकें जमा करण्यासाठी मुंबईसारख्या मोठ्या शहरातून मोठेंच क्षेत्र उपलब्ध असते. तिथे अनेक जुन्या जुन्या कुटुंबांचे कौटुंबिक ग्रंथसंग्रह व कागदपत्रे अनेकदा विकून टाकण्यात येतात आणि त्यात कित्येक दुर्मिळ व अमूल्य पुस्तके असतात. अशी जुनी पुस्तके कुणी जमवून आणली तर मी ती अवश्य खरेदी करतो. मागे नगरवाला नावाच्या एका श्रीमंत बाईंनी आपल्या कौटुंबिक संग्रहातील जुनी झालेली अशी पुस्तके व कागदपत्रे काढून टाकली होती. एका रद्दीवाल्याने त्यांच्याकडून एक खोलीभर पुस्तके घेतली. आणि त्यातील काही पुस्तके पुण्याच्या एका गृहस्थाने खरेदी केली. पुस्तके घेऊन तो मजकडे आला आणि मला हवी असल्यास ती त्याने देऊ केली. मी ती

पुस्तके चाळून त्याला म्हटले, मी या पुस्तकाचे तुला १५०० रुपये देतो. त्याला ते खरेच वाटेना. मी आतून पैसे आणले तेव्हा कुठे त्याचा माझ्या बोलण्यावर विश्वास बसला.

"त्या रद्दीत मला "इंडियन अँटिक्वेरी" चे रिपोर्ट सापडले. हे रिपोर्ट आज अतिशय दुर्मिळ आहेत. म्हणून त्याचीच मला किंमत मिळणार होती. त्याच लॉटमध्ये मला वॉरन हेस्टिंग्सने तयार करविलेला इंग्लिश-पर्शियन शब्दकोष मिळाला तो निराळाच.

"पेशव्यांचा फारशी पत्रव्यवहार करणाऱ्या एका सरदार घराण्यातील कागदपत्रांपैकी ११ पोती भरतील इतके कागद एकदा एका रद्दीवाल्याने आणले. माझ्या हाती ते कागद येईतोवर त्यातील अर्धे अधिक गेले सुद्धा असतील. उरलेली कागदपत्रे मी विकत घेतली. ती सर्व पत्रे फारशीत व मोडीत लिहिलेली होती. ती वाचून तपासून पाहायला आणखीच खर्च झाला, पण त्यात महादजी शिंदाचा पत्रव्यवहार सापडला. त्यात मोडी लिपीत जमाखर्चाचे हिशेब लिहिलेले होते. तो पत्रसंग्रह भारत इतिहास संशोधक मंडळास मी दिला. 'महाराष्ट्राचा आर्थिक इतिहास' या ग्रंथासाठी गोखले इन्स्टिट्यूटने यापैकी अनेक पत्रांचा उपयोग करून घेतलेला आहे असे कळते."

"रद्दीरूपी वाळूतून ग्रंथरूपी सुवर्णकण गोळा करण्याचाच हा प्रकार नाही काय?"

"होय, सुवर्णकण म्हणावे अशी काही पुस्तके मजकडे होती. हिंदी भाषेतील पण उर्दू लिपीत लिहिलेल्या 'तुळशी रामायणा'ची एक प्रत एकदा रद्दीतून माझ्या हाती आली होती. हा ग्रंथ दोन भागात होता. त्याला शालूचे मुलायम बाइंडिंग केलेले होते. त्यातील दोहे लाल शाईने व चौपाया काळ्या शाईने हाती लिहिलेल्या होत्या व हातानेच

काढलेली १०० वर रंगीत चित्रे होती. ती चित्रेच मुळी ३-४ शे वर्षांपूर्वी काढलेली असावीत. त्या चित्रात हजार हात असलेल्या एका पुरुषाचे चित्र होते. त्यावरून ते सहस्रार्जुनाचे चित्र होते हे मी ओळखले आणि त्यावरून चौकशी करता ते 'तुळशी रामायण' आहे असे अखेर आढळून आले.

"ते पुस्तक पुण्यातीलच एका रद्दीवाल्याकडून मला मिळाले. पण ते त्याच्याकडे कुठून कसे आले हे त्यालाही सांगता येत नव्हते. पुण्यात तुरुंगवासात असलेल्या पठाण सरदाराच्या मालकीचा तो ग्रंथ असावा असा माझा तर्क आहे. पुस्तक हस्तगत केल्यापासून मी अनेक विद्वान गृहस्थांना ते दाखवले आणि त्याच्या किंमतीचा अंदाज घेतला. दोन वर्षेपर्यंत मी थांबलो आणि त्याची किंमत २५० रुपयांपर्यंत जाऊन पोचली. मध्यंतरी राष्ट्रपती राजेंद्र प्रसाद यांनी पुण्यास भेट दिली तेव्हा ते 'रामायण' (राष्ट्रभाषा सभेकडे आहे) त्यांना दाखवले, आणि ते तपासून पाहात असतानाचे त्यांचे फोटोही वृत्तपत्रातून आले त्यामुळे त्या उर्दू रामायणाबद्दल वाचक, विद्वानांमध्ये खूपच कुतूहल निर्माण झाले. सुमारे दोन वर्षेपर्यंत उर्दू रामायणाचे ते सचित्र पुस्तक मी सांभाळून ठेवले होते. दत्तोपंत पोतदार म्हणाले, त्याची किंमत निदान २८०० रुपयांपर्यंत यायला हवी. दूरवरून या पुस्तकाला मागण्या आल्या. पण पोतदार म्हणायचे, हे पुस्तक पुण्यातच राहिले पाहिजे ' त्यांच्या विनंतीस मान देऊन 'हे पुस्तक मी पुण्याच्या 'राष्ट्रभाषा सभा' या संस्थेला दिले संस्थेने त्याची मला भरपूर किंमत दिली आणि ते पुण्यातच राहिले

"शिवाजीचा वंशवृक्ष या नावाचे दुसरे एक हस्तलिखित, कोल्हापूरच्या एका रद्दीवाल्याकडून मला मिळाले होते याचे स्वरूप म्हणजे लांबचलांब कागदाच्या सुरनळ्यासारखे होते. पण त्याच्या घड्या घातलेल्या

होत्या. या सुरनळीच्या पायथ्याशी शेषशायी झोपलेले दाखवले होते व वर शिवछत्रपती होते. या पुस्तकाचे छायाचित्र सकाळमध्ये प्रसिद्ध झाले होते. दिल्लीला १४ भाषांतील जुन्या दुर्मिळ ग्रंथाचे प्रदर्शन झाले होते. तेव्हा हुमायून कबीर हे दुर्मिळ पुस्तक पाहून खुष झाले. बरेच दिवस हे पुस्तक मजजवळ होते. इंटर नॅशनल बुक कंपनीच्या दीक्षितांनी हे पुस्तक जवाहरलाल नेहरू याना दाखविले होते आणि त्या प्रसंगाचे छायाचित्रही वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाले पण या पुस्तकाची किंमत फार मिळाली नाही.

" नवसारीला मोरेदजी देसाई या नावाचे एक पारशी वजनदार गृहस्थ होते. त्याना ग्रंथसंग्रहाचा विलक्षण नाद असावा. पुढे दुर्दैवाने त्याची दुर्दशा झाली, आणि त्याच्या वंशजानी त्याचा तो अमूल्य ग्रंथसंग्रह लिलावाने विकून टाकला. त्याच्या मुलीने तो संग्रह नगरला आणला; आणि नगरला त्या पुस्तकाचा लिलाव झाला. एका रद्दीवाल्याने ती पुस्तके पुण्यास आणली. २३ पोती भरून पुस्तके, हस्त लिखिते मोटारात लादून तो इथे आला व मला त्याने निरोप पाठवला ' बघा माल आणलाय. तुम्ही सांगता तर उतरतो. नाहीतर पाठवतो सरळ मुद्रव्याला. '

" मी म्हटल, उतर, बघू या काय आणले आहेस ते मी त्या जागी गेलो तेव्हा तिथे उभे राहवत नव्हत. त्या रद्दी कागदाना कुजल्यासारखा वास मारत होता—इतकी जुनी, कुजलेली व धुळीने भरलेली ती पुस्तके हाताळणे कठीणच काम होते नाकाला फडके बांधून मी ती पोती धुडाळायला सुरुवात केली. आठ दिवसपर्यंत माझे ते काम चालू होते त्या जुनाट कुजक्या वासाने माझे डोके भणाणले, पण त्या रद्दीतूनही काही चांगली पुस्तके हातात आली.

" त्या माणसाने दोन आणे किलो याप्रमाणे ती रद्दी आणली होती. पण त्यातील कागद इतके जुने झालेले होते की पुड्या बांधण्यासाठीही ते उपयोगाचे नव्हते. पण त्यातून मी १५० किलो वजन भरतील इतकी कागदपत्रं निवडली. त्यात मला १८१० साली छापलेली काही गुजराती पुस्तके मिळाली. काही पर्शियन हस्तलिखितेही त्यात होती. त्या हस्तलिखितात एक तैमूरलगाचे हस्तलिखित चरित्र होते. प्रेमानंद नावाच्या एका गुजराती कवीचे हस्तलिखित काव्य ' हरी लीला ' हे या जुन्या रगाड्यात मला मिळाले. सवत १७११ चे हे हस्तलिखित आहे. आज सवत २०२३ आहे. म्हणजे सुमारे ३०० वर्षांपूर्वीचे हे हस्तलिखित आहे असे म्हणायला हरकत नाही. हे पुस्तक अजूनपर्यंत माझ्याकडे होते. आता ते नॅशनल लायब्ररीने विकत घेतले आहे.

" प्राकृत जैन धर्मी व पंडित हेमचंद्र याचे ' देशी नाम माला ' नावाचे एक हस्तलिखितही या कागदात मला मिळाले होते. हा प्राकृत कोश होता व तो साधारण ११०० च्या सुमाराचा असावा. ' देशी नाम माला ' पुढे डेक्कन कॉलेजने विकत घेतला. याच लाटात मला ' दिनकार्य ' नावाच्या पारशी धर्मग्रंथाचे हस्तलिखित सापडले होते. डॉक्टर कागा याच्या मताप्रमाणे ते निदान २०० वर्षांपूर्वीचे तरी असावे.

" एका जुन्या रद्दीवाल्याच्या दुकानात हस्तलिखित पोथ्यांचा आणखी एक लॉट माझे हाती आला होता. बाळशास्त्री रानडे याना बाळ सरस्वती म्हणत. त्याच्या बुदुयातील पोथ्याचा तो सच होता. या पोथ्या सुमारे २५० वर्षांपूर्वीच्या तरी असाव्यात. त्यातील चित्रे मराठा पद्धतीची आहेत. धरमपूरच्या महाराजानी तो खरेदी केला. धरमपूरचे महाराज व्यासगी आहेत. ते इतिहास सशोधक मडळात येत असत. महाराजा विष्णुदेव शिसोदिया हे आमच्याकडे आले की आमच्या घरातील मडळी

एकदम सुरु होउन जात कारण ते आले की शे-दोनशे रुपयांची जुनी पुस्तके नेणारच हे समीकरण ठरलेले आहे. बाळशास्त्री रानडे याच्या संग्रहातील या पोथ्यावर त्यांनी जर्नल ऑफ ओरिएण्टल इन्स्टिट्यूटमध्ये एक निबंध प्रसिद्ध केला होता.

"काशास राहणारे वैद्यनाथ पायगुंडे (नागोजी भट्ट वैयाकरणी याचे शिष्य) यानी लिहिलेल्या पाच सहा पोथ्या याच लॉटमध्ये माझ्या हाती आल्या होत्या. त्या पुढे डेक्कन कॉलेजने घेतल्या.

"जुनी पुस्तके शोधून मिळवायची म्हणजे मोठे कटकटीचेच काम असते. जुन्या रद्दीवाल्याच्या दुकानातून त्यासाठी सारखे फिरत राहिले पाहिजे. कुणाकडे कुठली पुस्तके आली आहेत हे त्याहाळून ठेवले पाहिजे कोणत्या वेळी, कुठल्या पुस्तकाला मागणी येईल सागता येत नाही एकदा सहज एका रद्दीवाल्याच्या दुकानात शिरलो तर तिथे ' माऊथ इंडियन आर्किटेक्चर', नावाचे एक फ्रेंच भाषेतील पुस्तक दिसले फारच मोठ्या आकारातील ते पुस्तक होते. त्यात २५० आर्ट प्लेट्स होत्या १८२२ साली प्रसिद्ध झालेल्या त्या पुस्तकात अजठा लेण्यातील पडून गळल्या काही शिल्पाची, पूर्वीच्या सपूर्णावस्थेतील चित्रे आहेत यावरून त्या ग्रथाचे मूल्य आपल्या नजरेस यावे डेक्कन कॉलेजने हे पुस्तक लागलीच खरेदी केले एका प्रख्यात पुस्तकविक्रेत्याच्या कॅटलॉगमध्ये याची किंमत २००० रु. लिहिली होती !

"पण यासाठी पायपीट करावी लागते, तसेच सारखे वाचनही करीत राहावे लागते हाती आलेल्या प्रत्येक महत्त्वाच्या पुस्तकाची संदर्भ ग्रंथसूची मी पाहतो व त्यात उल्लेख असलेली पुस्तके बाजारात शोधीत राहतो त्या त्या विषयावरील हे संदर्भ ग्रथ संशोधक व विद्यार्थी कधी तरी मागायला येतातच, आणि वेळी ती पुस्तके मजकडे

नसली तर मी इतर तसलीच दुर्मिळ पुस्तके त्याना सुचवू शकतो. यासाठी थोर अभ्यासक विद्वानाच्या संग्रहातील पुस्तके विक्रीस निघाली तर मी ती कधीही सोडीत नाही. स. आ. जोगळेकर याची काही पुस्तके मी ३००–३०० रुपयास विकत घेतली.

"जोगळेकराच्या संग्रहात, कॅप्टन मॅक्डोनाल्ड यानी लिहिलेली नाना फडणिसाची एक बखर मिळाली. त्यात नानाच्या मेणवली येथील वाड्यातील दृश्याची ७–८ रंगीत चित्रे होती. थोरल्या माधवरावाचे एक चित्र त्यात होते व त्याच्याखाली Thorala Madhavrao थोरला माधवराव असे इंग्रजीत लिहिले होते. थोरल्या माधवरावाचे ते चित्र 'स्वामी' कादंबरीच्या स्वस्त आवृत्तीमध्ये आता पाहायला मिळेल."

मी म्हटले, "थोरामोठ्या माणसाच्या सह्या असलेली पुस्तके गोळा करण्याचा मला थोडा छंद आहे. आपल्या संग्रही अशी काही पुस्तके आहेत का?"

"वा, जरूर! अशी काही पुस्तके मी आपणाला आताही देऊ शकतो!"

"पाश्चात्य देशातून अशा तऱ्हेच्या पुस्तकाना मोठीच मागणी असते व असली पुस्तके हस्तगत करण्यासाठी लोक मोठी किंमत द्यावयास तयार असतात. आपण याबाबत अजून मागासलेलेच आहोत. अशा पुस्तकाची किंमत जशी इथे यायला हवी तशी येत नाही. तरीही अशा सह्याची पुस्तके हाती आली तर मी जाऊ देत नाही. स्वर्गीय नामदार गोखले, के. टी. तेलंग, न्या. रानडे, लो. टिळक, राम गणेश गडकरी, वामनराव जोशी याच्या सह्या असलेली अनेक पुस्तके मजकडे आली होती. गडकऱ्याची कोटीप्रियता किंवा अनुप्रासप्रियता त्याच्या

सहीखालच्या तारखेवरूनसुद्धा दिसून येते. एका पुस्तकावर त्याची सही होती व त्याखाली १२-१२-१२ ही तारीख होती. हेच त्या जुन्या पुस्तकाबाबतचे मुख्य आकर्षण होते. मुंबईचे बापूराव नाईक यांनी ते सहीवाले पुस्तक खरेदी केले.

" राजारामशास्त्री भागवत यांनी लिहिलेले १८७२ सालचे ' शब्द-व्युत्पत्ति कौमुदी ' या नावाचे एक पुस्तक असेच माझ्या हाती आले. त्यावर न्यायमूर्ती तेलंग यांची सही ( Initials ) होती. ती के. टी. टी. अशी इंग्रजी आद्याक्षरे देऊन केलेली होती

" सुप्रसिद्ध जर्मन पंडित मॅक्समुल्लर यांची सही असलेले एक पुस्तक मी मिळविले होते. ते फ्रेंचच्या एका मंत्र्याने खरेदी केले

" न्या रानडे यांचा वाडा ट्रस्टींनी विकला त्यात त्यांचे जुने ग्रंथालयही विकले गेले त्यातील त्यांच्या सह्या असलेली चार-पाच पुस्तके मला मिळाली. त्यांच्या व्याख्यानांची टाचणे, वृत्तपत्रात आलेल्या भाषणांची कात्रणे त्यांनी ठेवली होती तीही मला मिळाली त्यातील व्यापारोत्तेजक व्याख्यान हल्ली गोखले इन्स्टिट्यूटने प्रसिद्ध केली आहेत.

" काही पुस्तके अशी असतात की, त्यांचा आता तसा काही उपयोग नसतो पण थोर लोकांचा त्या पुस्तकाशी संबंध आला होता म्हणून मी ती विकत घेतो चंदावरकरांनी गोखल्यांना पाठवलेले, " कॉझेस अँड प्रिव्हेन्शन ऑफ प्लेग " हे पुस्तक, किंवा कोल्हटकरांनी माडखोलकरांना दिलेले " गीतोपायन " हे पुस्तक, याच कारणासाठी मी घेतले होते

" तसे दुर्मिळ वाटणारे कुठलेही पुस्तक मी सहसा हातातून जाऊ देत नाही आता तर १८८० च्या मागचीं सर्वच पुस्तके मी खरेदी करतो. कारण कोणत्या वेळी कुठल्या पुस्तकाला मागणी येईल, याचा भरवसाच

नसतो. अहो, मराठी शाळेत आपण गिरवत असतो ते मोडी कित्ते जुन्यातले जुने, मी जमवून ठेवलेले आहेत. वहूनाना रानडे याचा कित्ता पूर्वी फार लोकप्रिय होता. जगद्हितेच्छु प्रेसचे कित्तेही लोकप्रिय होते. येथील एका कॉलेजात मराठीच्या प्रोफेसरांची नेमणूक व्हायची होती. परीक्षक मडळात न. र. फाटक, पोतदार वगैरे मडळी होती. उमेदवारांची चाचणी घेण्यापूर्वी फाटक यांनी मजकडून दोन-तीन जुने मोडी कित्ते नेले. त्यांनी उमेदवार प्रोफेसरांना ' मोडी वाचता येते काय ? ' म्हणून विचारले. ' होय ' असे उत्तर येताच त्यांनी कित्ते बाहेर काढले व ते त्यांना वाचायला दिले

" सर्व भाषांतील, सर्व विषयांवरील जुनी पुस्तके मी जमवीत राहता १८९५ पासून १९१२ पर्यंतचे राष्ट्रीय सभेचे सर्व वृत्तान्त मजकडे आहेत खान-पाणदीकर विवाहाच्या वेळी लिहिलेल्या पद्यावल्या, क्राफर्ड प्रकरण ( क्राफर्ड हा कमिशनर होता व तो मामलेदाऱ्या राजरोस विकायचा ), पारशी-मुसलमानांचे दंगे, जुन्या मेळ्यांच्या पद्यावल्या वगैरे साहित्य मी हाती आले तेव्हा जपून ठेवले. ते आता अधूनमधून मला पैसे देऊन जाते १९०८ साली टिळक खटल्याच्या वेळी त्यांच्यावर झालेली कवन सन्मित्र मेळ्याच्या पद्यावलीत छापलेली होती पुढे ही पद्यावली सरकारने जप्त केली तिची एक प्रत मजकडे होती यातील एक पद न र फाटक यांनी गोखल्यांच्या चरित्रात घातले आहे ती प्रत मीच त्यांना पुरवली आहे

" दुर्मिळ पुस्तकांच्या खरेदीविक्रीचा धंदा मी करीत असलो तरी कुठलेही पुस्तक दुर्मिळ नाही असे मी नेहमी म्हणत आलो आहे, आणि अनेक व्यासंगी विद्वानांना हवी असलेली दुष्प्राप्य व दुर्मिळ पुस्तके मी त्यांना मिळवून दिलेली आहेत

" सूचिकार कै. श. ग. दाते याना हवे असलेले 'इनाम कमिशनचा गैर इन्साफ' हे पुस्तक त्याना कलकत्याच्या नॅशनल लायब्ररीत बघायला मिळाले होते. स्वत:च्या उपयोगासाठी त्याना त्याची एक प्रत हवी होती. पण ती मिळेना. एकदा त्यांची भेट झाल्यानंतर ते मला म्हणाले, 'बघ, या पुस्तकाची जर एखादी प्रत तू मला मिळवून दिलीस, तरच तू खरा जुनी दुर्मिळ पुस्तके मिळवणारा.'

" मी म्हटले, मी देतो तुम्हाला त्याची प्रत मिळवून."

" ते म्हणाले, जर तू मला त्या पुस्तकाची प्रत मिळवून दिलीस, तर मी तुला २० रु. बक्षीस देईन "

" आणि महिनाभरात मी ते पुस्तक मिळवून त्याना दिले नि पैज जिंकली.

" त्यांनी न बोलता पैसे काढले नि देऊ केले पण ते माझे स्नेहीच असल्यामुळे ते मी घेतले मात्र नाहीत

" असे म्हणतात की वरील पुस्तक कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीच निनावी लिहिले आहे कारण चिपळूणकर हे सरकारी नोकर असल्यामुळे इनाम कमिशनविरुद्ध उघडपणे काही लिहिता येत नव्हते.

" अशा आहेत आमच्या रद्दीतल्या या गोष्टी !"

" वा, वा ! मी म्हटलं रद्दीतील निवडक रत्नेच म्हणा ना !"

• • •

[ जुन्या पुस्तकाचा क्रयविक्रय करणार पुण्याचे श्री पा रा ढमढेरे याची मुलाखत ]

प्रकरण सहावे

# काही वाचक

काही म्हणा पण लोकाना वाचनाची गोडी दिवसेंदिवस जास्त लागत चालली आहे हे नाकबूल करता येणार नाही, तुम्हाला ! तरुण असो, वृद्ध असो, कारकून असो अगर कामगार असो, प्रत्यकजण काहीना काही वाचात असतोच दिवसाकाठी कारकून मडळी टाइम्सच्या घड्या काखोटीला मारून ऐटीत जात असतील तर कामगार मन्ळी सद्दा पैशाचा एखादा पेपर घेऊन, 'लाल बावन्याचा प्रचन्ड विजय', 'सक्सेरिया मिल्च्या दारात निरोधन' या त्याच्या जीवनाशी सलग्न असलेल्या बातम्या वाचीत असताना दिसून यतील

शाळच्या पायरीवर ज्यानी कधी पायच ठेवलेला नाही त्याचा गोष्ट सोडा पण मी म्हणतो ती तरी का सोडा ? आता साक्षरताप्रसाराच्या मोहिमुळे ही मडळीसुद्धा र ट फ वाचू लागली आहेत आणि एखाद्याला एखादी गोष्ट नवीनच उपलब्ध किंवा साध्य झाली की तो जसा तिचा अगदी पाठपुरावा करीत राहतो, तशीच नवीन वाचावयास शिकलेली हा मन्ळी आता मिळेल ते पत्र, चिठोरी, सिनमाच्या जाहिराता धडाक्याने वाचीत आहेत नवसाक्षरासाठी तर पुस्तकेच पुस्तक बाहेर पडत आहेत

काही का असेना, मला एवढेच म्हणावयाचे आहे की, वाचण्याची गोडी दिवसेंदिवस लोकांना जास्त जास्त लागत चालली आहे.

वर्तमानपत्रे, साप्ताहिके, मासिके आणि रंगीबेरंगी वेष्टनातील ही नवीनवी पुस्तके जी रोजच्या रोज बाहेर पडत असतात त्यावरूनही हेच स्पष्ट होते आता ही नवी निघणारी वृत्तपत्रे चार सहा महिन्यात बंद पडतात व रंगीबेरंगी पुस्तके लौकरच रस्त्याच्या कडेला 'दो दो आनामें' च्या राशीत जाऊन पडतात ही गोष्ट निराळी पण यावरून ती वाचली जात नाहीत असे म्हणणे योग्य होणार नाही. ती वाचली जातात. फक्त विकली मात्र जात नाहीत.

थोडक्यात काय ! वाचकांची संख्या दिवसेंदिवस वाढीस लागत आहे, पुष्कळच वाढली आहे. इतकेच नाही तर आज या वाढत्या वाचकवर्गा विषयी विचार करणे भाग होऊ लागले आहे. अर्थातच निरनिराळे लोक निरनिराळ्या रीतीने यावावत विचार करू शकतील मी मात्र भलत्या-सलत्या तत्वज्ञानात न शिरता त्यांचे काही प्रकार, त्यांच्या वाचण्याच्या पद्धती यांविषयीच सांगणार आहे त्यातील एक दोन गटांना मी माझ्या मताप्रमाणे नावे सुद्धा देणार आहे पण ती माझ्या पुरतीच ! इतरांनी त्याचा स्वीकार केलाच पाहिजे असा काही माझा आग्रह नाही.

अगदी पहिल्या प्रथम वाचकांच्या ज्या एका वर्गाविषयी मी सांगणार आहे त्या वर्गाला सामान्य वर्ग असे नाव द्यायला मला काही हरकत वाटत नाही.

सामान्य म्हणजे तीन आणे माल, एक आणा माल अगर ताजी बातमी, राजदटासारखी चिटोरी वाचणारे वाचक असे माझे म्हणणे नाही, तर ज्याच्या आयुष्यात वाचनविषयक धाडस, धडपड, युक्त्या, कावे इत्यादी प्रकार कधी घडून येत नाहीत ते लोक ! स्पष्टच

म्हणावयाचे तर जे लोक आपल्या आवडीच्या विषयावरील किंवा आवडत्या लेखकाची पुस्तके खरेदी करतात आणि रोज सकाळी नियमितपणे ज्यांच्याकडे वृत्तपत्रे येत असतात ते लोक. सकाळच्या चहापानानंतर अगर रात्री जेवणानंतर धूम्रपानाचा मधुर आनंद उपभोगीत, वर्तमानपत्रनिमित्याने टाकलेला ताजा अंक अगर नुकतीच प्रसिद्ध झालेली एखादी सुंदर कादंबरी चाळीत आरामशीरपणे पडणे ही या वर्गाची मोठी आवडीची गोष्ट.

मात्र वाचकांच्या या सामान्य वर्गातही एक-दोन पोटभेद आहेत. एक, आपण विकत घेतलेल्या पत्रपुस्तकाचा दुसऱ्यांनी फायदा घेतलेला न आवडणाऱ्यांचा. आपल्या वाचनात व्यत्यय तर काय, पण वाचताना पुस्तकात कोणी डोकावून पाहिलेलेही त्यांना खपणार नाही. आणि दुसरा, पत्राचे नाव व ध्येयधोरणापासून, जाहिरातीसुद्धा, अमुक गृहस्थांनी, अमक्या मुद्रणालयात छापून अमक्या ठिकाणी प्रसिद्ध केले या मजकुरापर्यंत वाचून काढणाऱ्यांचा. आपल्या पैशाचे मोल याच्याइतक्या जागरूकतेने दुसरे कोणी क्वचितच करीत असेल

वाचकांचा दुसरा वर्ग सगळ्याच बाबतीत या पहिल्या वर्गाच्या अगदी विरुद्ध. या वर्गाला मी नेहमी चव्हाऊ वर्ग म्हणून उल्लेखीत असतो. या वर्गातील लोकांना वाचनाची अगदी मनस्वी आवड. एखाद दिवस वाचले नाही तर त्यांना चैनच पडणार नाही. फक्त वाचनासाठी स्वतःच्या खिशातील पैसे खरचणे त्यांना पसंत नसते. जुन्या मराठेशाहीतील वीरांनी अमलात आणलेली मुलुखगिरीची प्रथा वाचकांचा हा वर्ग त्याच्याइतक्याच बेडर, बेगुमानपणे चालवीत असतो. वाचकांच्या गटातून एवढा एक गट जर वजा केला तर बाकीचे सगळे जवळ जवळ फिकेच दिसतील त्यामुळे.

तुम्ही नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एखाद्या सुंदर पुस्तकाची अगर मासिकाची एक ताजी प्रत घेऊन घरी येत असता ! घरी जाऊन केव्हा एकदा तिचा फडशा उडवतो असे तुम्हाला झालेले असते ! मोह अनावर होऊन रस्त्यातूनही तुम्ही पाने चाळीत चाळीत जात असता ! आणि तितक्यात वाचकांच्या वरील चढाऊ वर्गात मोडणारा तुमचा एखादा मित्र समोरून येतो.

अगदी सहजगत्या तो तुमच्या पाठीवर थाप मारतो व म्हणतो, ' फसल रे हे पुस्तक-फोर करकरीत ! वेष्टनसुद्धा अगदी आकर्षक आहे बुवा ! '

अगोदरच खुषीत असलेले तुम्ही त्याच्या बोलण्याने जास्तच खुलता. ' हो फडक्याच नव पुस्तक ' तुम्ही ऐटीत सागता.

' कोण ! फडके ? आपले तर आवडते लेखक ! ' तुमचा मित्र म्हणतो आणि पुस्तक जवळ जवळ तो तुमच्या हातातून हिसकावून घेतो. भराभर पाने चाळून एक दोन सुंदर उतारेही तो तुम्हाला वाचून दाखवितो आणि पुस्तकाची घडी आपल्या काखेत मारून म्हणतो, ' उद्या सध्या काळपर्यंत देतो मी परत फडके म्हटले की असा मोह होतो बघ ! ' मी नेऊ का, असे विचारण्याची सुद्धा त्याला गरज वाटत नाही

' अरे, नुकतच मी घेतलय ते ! पुर चाळल सुद्धा नाही. ' तुम्ही आर्जवे करण्याचा प्रयत्न करता

' तू वाचशीलच आता निकतच घेतल आहेस म्हणा ' तो म्हणता आणि चाऊ लागतो तुम्ही चडफडत घरी येता.

तुमच्या वर्तमानपत्राचीही हीच गत सकाळी पोऱ्याने आणून टाक लेला अक उचलून तुम्ही पहिल्या पानावरील मथळा वाचला नाहात

तोच शेजारचे रामभाऊ तुम्हाला हाका मारीत येतात. 'काय हो, जॉनसन काय म्हणतात आज?' रामभाऊच्या हाकाकडे अगर जवळ येऊन उभे राहण्याकडे लक्ष न देता तुम्ही तसेच वाचीत राहिलात तर दुसऱ्या बाजूने कम्युनिस्ट पार्टीचा एखादा पुरस्कर्ता येऊन उभा राहतो! 'जॉनसन काय म्हणणार डोंबल! व्हिएतनामने कसा दाखविला इंगा! म्हणे माझा पराभव झाला!' तो टोमणा देतो.

ते दोघेही आपसात वाद करतात आणि स्वमतपुष्ट्यर्थ उदाहरणे दाखविण्यासाठी म्हणून तुमच्या हातातील पत्रापैकी एक पान एकजण घेतो व दुसरा दुसरे घेतो. तुम्ही चटफडत तिथेच उभे राहता. त्याचा वाद ऐकून तेवढ्यात शेजारच्या खोल्यातील बहुतेकजण तिथे जमा होतात. हो! एवढा वाद ज्या अर्थी होत आहे त्या अर्थी बातमी तशीच काही महत्त्वाची असणार ही प्रत्येकाची समजूत. त्या एकेका पानावर त्याची झुंड पडते. जॉनसनवादी व कम्युनिस्ट त्या झुंडीचा त्रास चुकविण्यासाठी तुमच्या पत्रासह आपआपल्या खोलीत शिरतात आणि तुम्ही निदान त्या पत्राचा चोळामोळा तरी परत हातात पडतो की नाही याची चिंता करीत खोलीत येता.

माझ्या एका मित्राने या प्रकाराला वैतागून एकदा बाहेर ग्यालरीत वृत्तपत्र वाचावयाचेच नाही असे ठरवून खोलीत नेले. पण काय उपयोग? यामुळे त्याला त्या चटाऊ वाचकाची खोड मोडता तर नाहीच आली, पण ते सगळे खोलीत जमल्यामुळे त्याना चहा पाजा लागला व त्याचा तो दैनिक धागडधिंगा त्या दिवशी खोलीतच सुरू झाल्यामुळे वाचकोची बोलणी खावी लागली.

हे चटाऊ वाचक तुमच्यावर घरीच हल्ला करतात अगर तुम्ही त्याच्या ओळखीचे असलाच पाहिजेत असे नाही. बस-नाक्यावर, प्लॅट-

फॉर्मेनर, आगगाडीत वाटेल तिथे ते तुमच्यावर आक्रमण करीत असतात. माझ्या वरील मित्राने कंटाळून शेवटी घरी पत्र न घेता परस्पर कचेरीत जाताना रेल्वेस्टॉलवर घेण्याचे ठरवले. त्या दिवशी स्टेशनात पत्र खरेदी करून तो गाडीत शिरला व कोपऱ्यातील जागा पकडून त्याने ते तोंडा समोर धरले. थोडा वेळ नीट गेला पण त्यानतर पलीकडच्या बाजूने आपल्या पत्रावर कोणीतरी आघात करीत आहेसे त्याला वाटले त्याने वर मान करून पाहिले. तो समोर बसलेल्या एका अधयानत् माणसाचे ' माफ करा पण एक पान जरा देऊ शकता का ' हे शब्द त्याला ऐकू आले. काय करतो बिचारा ! सौजन्य न दाखवावे तर जगली माण-सातच जमा होऊ या भीतीने त्याने दोन्ही पाने देऊन टाकली. पूर्ण विचाराती माझा हा मित्र स्वत च आता या चढाऊ वाचकवर्गात दाखल झाला आहे.

वाचकातील या दोन प्रमुख वर्गानतर आता इतर सटरफटर लोका-कडे वळावयाला हरकत नाही. पहिल्या प्रथम आपण अभ्यासू वाचका-कडे लक्ष देऊ. *कोणाचेही मागून आणलेले पुस्तक असा, ते कितीही किमतीचे असो,* हे वाचक त्यातील पानापानावर खुणा केल्यावाचून राहणार नाहीत. सुदर ओळींच्या खाली हे लाल रेघा मारतील. समग्र प्याराच सुदर असला तर कोपऱ्यात एक लाबलचक उभी रेघ काढतात. न समजणाऱ्या वाक्यापुढे प्रश्नचिन्हे देतील किंवा समास याचा अर्थ म्हणून लिहितील ओहो, सुदर, रिअली गुड वगैरे शब्दांची पखरणही ते मधून मधून पाडण्यास कमी करणार नाहीत अभ्यासूच ते ! आपल्या नतरच्या वाचकाना त्रास पडू नये म्हणून त्याचा हा सगळा उद्योग.

स्टॉलवरील मोहरबद अकांचे कोपरे उघडून वाचण्याचा प्रयत्न करणारे वाचक, मासिकावरील पत्रविरया पोराच्या पुस्तातील अक निर्धोक

उचलून व त्याना आशेवर टेवून वाचणारे वाचक, हॉटेलात जाऊन आण्याच्या सिगारेटच्या बदल्यात दोन-चार पत्रे वाचणारे वाचक व शोभेसाठी हातात पुस्तके बाळगणारे वाचक याचा नंतर वरील अभ्यासू (!) वाचकानंतर लावायला काही हरकत नाही

याचे पुस्तक त्याला व त्याचे पुस्तक याला परत करणाऱ्या, साखळी पद्धतीने पुस्तकाचा प्रसार करणाऱ्या व पुस्तके नी पत्रे परत करण्यास अजिबात विसरणाऱ्या वाचकाचाही येथे उल्लेख केला पाहिजे. माझा एक मित्र तर या बाबतीत फारच विसरभोळा आहे चार महि न्यानी एकदा तो आपल्याकडे विसरून पडून राहिलेल्या वर्तमानपत्राचा जमवाजमव करतो, आणि ही रद्दी त्याला सहज दीडदोन रुपये मिळवून देते.

याशिवाय वाचकाचा आणखी एक उल्लेखनीय वर्ग आहे हा वर्ग विशेषत सार्वजनिक वाचनालयात आढळून येतो. एखादे मासिक अगर साप्ताहिक वृत्तपत्र तासन् तास अडवून ठेवणे, दुसरा वाचीत असता त्या पत्राची मागची पुढची पाने उगीचच चाळणे, सुवासिक तेल, दत-मंजन इत्यादिकाच्या फुकट नमुन्याची कुपने कापून लाबविणे आणि तोंडावर एखादे वृत्तपत्र धारण करून एखाद्या कोपऱ्यात घोरत पडणे एवढी महत्कार्ये हा वर्ग पार पाडीत असतो

माझ्या अवलोकनात आलेल्या वाचकाच्या एवढ्या निरनिराळ्या वर्गाविषयी लिहून मी आटोपते घेणार होतो, पण इतक्यात माझ्या धाकट्या भावाने टेबलावरील एक पुस्तक उचलले व ता अपहरणाचा पडला आता हा माझा धाकटा भाऊ वाचकाच्या आणखी एका निरा-ळ्याच वर्गात मोडतो हा वर्ग झोपेचे (म्हणजे झोप येण्याचे) औषध म्हणून

वाचनाचा उपयाग करीत असता झोप येत नसली तर हे एखाद पुस्तक उचलतात व वाचावयास सुरवात करतात आणि अर्ध्या-पाव तासात घोरहा लागतात या वाचकाना झापाळू म्हणावे की झोपेचे डॉक्टर म्हणावे ते मी अजून नक्की ठरविल नाही

• • •

प्रकरण सातवे

## वाचायला वेळच नाही !

न्यायमूर्ती छगला परवा राजीनामा देऊन मंत्रिमंडळातून बाहेर पडले तेव्हा त्यांना काही वार्ताहरांनी विचारले, 'आता पुढे काय करायचा विचार आहे आपला ?'

न्यायमूर्ती छगला म्हणाले, "किती तरी वाचायच आहे मला. अधिकारपदाचं ओझं एकदा का अंगावर पडलं की माणसाला चिंतनाला किंवा हव्या असलेल्या ग्रंथाच्या वाचनाला वेळ कसा तो मिळतच नाही."

छगलासारख्या परराष्ट्र मंत्रिपदावर असणाऱ्या थोरामोठ्यांची गोष्ट अपवादात्मक समजायला हरकत नाही. पण जेव्हा आपले काही अस्ताव्यस्त, मध्यमवर्गी मित्रही वाचायला आपल्याला वेळच सापडत नसल्याची तक्रार करतात तेव्हा मला त्यांची मोठी मौज वाटते.

माझ्या हातात प्राय नेहमी एखाद दुसरे पुस्तक असते. आगगाडीत, रेल्वे स्टेशनावर, बसचे रांगेत वाट पाहाताना, नाटकाची सुरुवात होण्यापूर्वी, जिथे म्हणून मला खोळंबून राहावे लागते तिथे वेळ वाया जाऊ न देता वाचन करता यावे हा माझा उद्देश असतो त्यात. माझ्या हातात नेहमी असलेले पुस्तक पाहून माझे काही मित्र मला नेहमी

म्हणतात, 'किती वाचतोस तरी तू ? वेळ कसा मिळतो तुला इतका ? मला वाचनासाठी वेळ कसा ता मिळतच नाही बघ ! '

जीवनाच्या रोजच्या रगाड्यातून वेळ काढणे सोपे असत असं मीही म्हणत नाही पण, तो मिळतच नाही हे मात्र खरे नव्हे. मनात असल तर रोजच्या रामरगाड्यातही थोडा फार वेळ वाचनासाठी काढता येणे शक्य आहे हे मी अनेक थोर पुरुषांच्या चरित्रातून शिकलो आहे

डॉ बाबासाहेब आंबेडकर, हे सार्वजनिक कार्यात इतके कार्यरत असत की, वाचनासाठी आपल्याला वेळच उरत नाही असे त्यांनी म्हटले असते तर त्यात कुणाला आश्चर्य वाटले ना ! पण त्यांनी वेळेबाबत कधीही तक्रार केल्ली कुणी ऐकलेली नाही. अहर्निश कार्यव्याप्त असूनही वाचनासाठी ते वेळ कसा काढीत ते अभ्यासण्यासारखे आहे

विधानसभेच्या, चर्चाविवादाच्या गरमागरम वातावरणात एकाग्रतेने वाचन करता येईल असं जर म्हटल तर ते कुणाला खरसुद्धा वाटणार नाही पण बाबासाहेबांचे तिथही वाचन चाले त कौन्सिल हॉलच्या आवारात मोटारीतून उतरत त मोठाले ग्रंथ हातात घेउन. जवळच उभा असलेला शिपाई झटकन पुढे होई व त्याच्या मोटारीतील जाडजूड ग्रंथ उचलून ते जिथे नमत तिथे समोर आणून ठेवी पुस्तकाचा तिथे असा ढिगारा होई की त्यामागे बाबासाहेबही कधी कधी झाकून जात.

सभागृहात आपल्या ठरलेल्या जागेवर येउन बसताच, ते हातातले पुस्तक उघडून वाचायला सुरवात करीत व लवकरच वाचनात मग्न होऊन पानामागून पान उलटीत जात तांबड्या, निळ्या रंगाची पेन्सील पुस्तकात जागाजागी फिरत राही मधून मधून सभागृहात

येणाऱ्या सदस्यांच्या नमस्काराचा स्वीकार करून ते पुन्हा वाचनात मग्न होत. सभेच्या कामास सुरुवात होईपर्यंत त्यांचे वाचन हे असे चाले.

मिळणाऱ्या क्षणमात्र फुरसतीचा सुद्धा बाबासाहेब असा वाचनासाठी उपयोग करून घेत. वाचायला वेळच नाही, अशी तक्रार करणारांना यापासून काहीच का शिकता येणार नाही ?

रोजच्या रगाड्यातून जरी असे साधले नाही तरी कधी कधी आपणास असे काही प्रसंग साधता येतात की त्या वेळी आपण एरवी न सापडलेल्या वेळेचा वचपा काढू शकतो. मला इथे स्वर्गीय श्री. रफी अहमद किडवाई यांची एक गोष्ट आठवते. किडवाई सार्वजनिक कार्यात व जीवनात इतके गढून गेलेले असत की वाचन सोडाच, पण विश्रांती किंवा विरंगुळ्यासाठीही त्यांना फुरसत होत नसे. मात्र याचा वचपा काढावा म्हणून ते अधून मधून एकदम भूमिगत होत असत या वेळी ते आपल्या इष्ट मित्रांना, सहकाऱ्यांना अगर नातेवाईकांना कुणालाच आपला थांगपत्ता लागू देत नसत. आणि मग अज्ञातवासात स्वतःला कोंडून घेऊन करीत काय ? तर, मनसोक्त वाचन !

विद्यार्थीदशेतच त्यांना वाचनाचे वेड लागले होते ते कल्पित कथा, विशेषतः गुप्त पोलिसांच्या चातुर्यकथा व रम्य भीषण कादंबऱ्या वाचीत. या कथा-कादंबऱ्यातून ते जी मानवी स्वभावचित्रे पटताळीत, त्या स्वभावचित्रांच्या अनुरोधानेच आपल्या आयुष्यातील कित्येक गोष्टींबाबत ते निर्णय घेत असत.

असो. मला म्हणायचे काय की वेळ नाहीच्या ओरडकारावर आपण वाचनाचे दार आदळू देऊ नये. वेळ शोधून काढणे आपल्याला अगदीच काही अशक्य नाही. कसे ते पाहू या !

आपल्यापैकीच एखाद्याचे आपण उदाहरण घेऊ. अतिशय जल्द नव्हे आणि अतिशय मंद नव्हे असा तो साधारण प्रतीचा वाचक आहे, असे आपण समजू. माझ्या अनुभवाप्रमाणे साधारणसा वाचक दर मिनिटाला दोनशे-तीनशे शब्द सहज वाचतो. मात्र वाचनाचा हा वेग सुद्धा, रोज नियमितपणे वाचन केल्यावाचून कायम राखता येणार नाही, हेही मी इथे स्पष्ट करतो. अर्थातच शास्त्रें, गणित, शेती, व्यापार, वैद्यक अशा आपणास अपरिचित असलेल्या जड विषयावरची पुस्तके मात्र कुणी इतक्या झपाट्याने वाचून आकलन करू शकणार नाही, हे खरे असले तरी, कथा, कादंबऱ्या, ललित निबंध, प्रवासवर्णन, चरित्रे ही मात्र साधारणसा वाचक वरील गतीने वाचून त्याचा आनंद उपभोगू शकेल हे नक्की.

*उठल्या सुटल्या प्रत्येक गोष्टीची आकडेवारी काढीत रमणे काही* इष्ट नव्हे. पण मिनिटाला दोनशे शब्द या प्रमाणात वाचनाचा जर हिशोब केला, तर आपल्यापुढे काय चित्र उभे राहते ते बघा. मिनिटाला दोनशे शब्द या हिशोबाने फक्त पधरा मिनिटे वाचन केले तरीही तेवढ्या वेळात तीन हजार शब्द आपण वाचू शकतो. असे आठवडाभर वाचले तर २१००० शब्द होतील. चार आठवड्याच्या एका महिन्यात आपण ८४००० शब्द वाचू आणि शेवटी याला ही १२ नी गुणले तर ही शब्दसंख्या १०००००० इतकी होईल. दररोज केवळ पधरा मिनिटे वाचन करून एखाद्या सर्वसाधारण वाचकाला वर्षभरात केवढे वाचन करता येईल याचा हा सर्वसाधारण अंदाज आहे.

आता प्रत्येक पुस्तकातील शब्दसंख्या काही सारखी नसते. साधारण पणे ६०००० ते १००००० पर्यंत ही शब्दसंख्या असू शकते. सोई-साठी प्रत्येक पुस्तकातील शब्दसंख्या सरासरी ७५००० आहे असे

वाचायला वेळच मिळत नाही ।



धरू या, म्हणजे रोज पधरा मिनिटाच्या वाचनामुळे साधारणसा वाचक वर्षभरात सुमारे १५ पुस्तके सहज वाचू शकतो असे झाले काही पुस्तके ल्हान असली तर ही सख्या सहज वीसापर्यंत जाऊ शकेल वर्षाकाठी वीस पुस्तकाचे वाचन म्हणजे काही थोडेथोडके नव्हे ग्रथाल्याचे सदस्य असलेल्या आपल्याकडील काही लोकसुद्धा इतक वाचन करू शकत नाहीत पण, मी वर म्हटल्याप्रमाणे रोजच्या पधरा मिनिटाच्या नियमित वाचनामुळे ते अगदी शक्य आह असच कुणालाही आढळून यईल

रोजच्या पधरा मिनिटाच्या नियमित वाचनाची ही कल्पना, मी माझ्या परिचयातील एका अत्यत उद्योगरत व अनुभवी अशा डॉक्टरा कडून उचलली होती डॉक्टरी पेशा व आपल्या व्यवसायातील अत्यत नैपुण्य यामुळे, सकाळी उठल्यापासून ता म यरात्रीपर्यंत त्याना कामापुढे वेळच काय पण विसावाही क्वचितच मिळे रात्री बहुधा ते फार उशिरा झापी जात पण झोपी जाण्यापूर्वी त्याचा एक पक्का नियम अस झापी जाण्यापूर्वी ते नेमाने वीस मिनिटपर्यंत वाचन करीत एखादेवळी अकरा वाजता अथरुणावर पडण्याइतकी सवड झाली तर त ११ पासून ११ २० पर्यंत वाचन करीत एखादे दिवशी अथरुणावर पडायला त्याना दान वाजले तर त २ ०० ते २ २० पर्यंत वाचन करीत आणि नतरच झापी जात आपला हा नित्यक्रम त्यानी आयुष्यभर पाळला वर्षाला वीस पुस्तके या हिशेबान त्यानी चाळीस वर्षात हजाराचे वर ग्रथाचे वाचन सहज केले असेल त्याच्या वाचनाचे विषयही त्याच्या व्यवसायापुरत मर्यादित नसत शास्त्रीय विषयाप्रमाणेच ललित ग्रथ, सस्कृत काव्य, प्रवास, चरित्रे, वगैरे सर्व विषयाचे त्याच चौफेर वाचन अस त्याचा ग्रथसग्रह तर निपुलच हाता आणि त्यातील अनेक ग्रथाचा मी फायदाही घतला हाता पण त्याच्यामुळ माझा सर्वात

मोठा फायदा झाला तो हा की, वाचनासाठी वेळ कसा काढावा हे मी त्यांच्याकडून शिकले त्यांचे सततोद्योगी जीवन आणि त्यातूनही वाचनासाठी ते काढीत असलेले क्षण मी पाहिले की, वाचायला वेळच नाही ही माझी सबबच मुळी थिटा पडत असे वाचनासाठी वळ कसा काढावा, याचे त्यांनी मला जणू समर्पक उत्तरच देऊन ठेवले होते.

अर्थातच झोपी जाण्यापूर्वीचाच पधरा मिनिट प्रत्यकाला साधता येतील किंवा साधली पाहिजेत, असं न हे दिवसभराच्या चाळीस तासाच्या अवकाशात आपल्या सोयीनुसार ही पधरा मिनिटाची सवड केव्हाही काढता येईल. पण ती नियमित मात्र काढली पाहिजे या नियमित पधरा मिनिटाशिवाय दिवसभरात आणखीही कितीतरी पुरस तीचे क्षण मधून मधून आपल्या हाती लागतातच त्याचाही आपल्याला अधिक वाचनासाठी उपयोग करून घेता येईल.

मात्र हे क्षण साधण्यासाठी आपणास पुस्तके सतत जवळ बाळगावी लागताल कारण असले क्षण केव्हा येतील त काही सागता यणार नाहीत खाणावळीत गेल्यावर पक्तीत नवर लागेपर्यंत होणारा खोळबा, डॉक्टरांच्या दवाखान्यात आपली पाळी येईपर्यंतचा वेळ, बेस वागून घेण्यासाठी वाट पाहात बसताना, नाट्यगृहात पडदा वर जाईपर्यंतचा वेळ किंवा आगगाडीतील रोजचा अर्ध्या तासाचा जाता येतानाचा प्रवास, हा सारा वेळ मनात आणले तर आपण वाचनाच कामी लावू शकतो. 'हे' कुणी म्हणेल, 'हे तुमच काही तराच सागण अशा पुरमतीचा खरोखरच वाचनासाठी कधी उपयोग होऊ शकेल काय?'

'का नाही?' श्रीमती दुर्गाबाई खोट याचे उदाहरण इथे साग्ण्या सारख आहे एरवी त्यांचे वाचन तर चाडू असतच पण स्टुडिओत कामाला जातानासुद्धा त्या एकदोन पुस्तके बरोबर घत मकअप करून

सेटवर असतानाही मधूनच मिळणारा वेळ गप्पासप्पात न घालविता त्या नाचीत राहात. त्यामुळे त्याचे वाचन अव्याहत चालू राही.

'आता सांगा, या लहान सहान फुरसतीच्या क्षणाचा फायदा घेतल्या मुळे वर्षभरातील आपल्या वीस पुस्तकांच्या मर्यादेत आणखी कितीतरी भर पडेल की नाही ? '

फक्त वाचायची इच्छा आणि पुस्तके हाताजवळ असली म्हणजे झाले. वाचनासाठी राखून ठेवलेल्या आपल्या पधरा मिनिटांपैकी एकही क्षण पुस्तके धुडाळण्यात वाया जाता कामा नये ही गोष्ट मी कटाक्षाने पाळतो. बाहेर जातानाही मी पुस्तके बरोबर घ्यायला विसरत नाही, याचे कारण तरी हेच. घरीसुद्धा टेबलावर बैठकीच्या जागी आणि झोपण्याच्या जागेजवळ एखादे दुसरे पुस्तक नेहमी हाताशी राहील, अशी मी काळजी घेत असतो, तीही याचसाठी.

वाचायला वेळच होत नाही, असं म्हणणाऱ्या माझ्या कित्येक मित्रांना माझा हा रोज पधरा मिनिटांचा फार्म्युला आता खूपच पटला आहे. एक दोघांनी आपण वर्षभरात खराखरच वीस पचवीस पुस्तके वाचू शकलो असे प्राजळपणे कबूल केले आहे. त्यांनी आपला हा नियम जर असाच चालू ठेवला तर वाचायला वेळच नाही, असं म्हणणारे माझे हे मित्र काही काळाने खरोखरच बहुश्रुत किंवा ज्यांनी खूपच वाचन केलेले आहे अशा लोकांत मोडतील यात सशयच नाही

• • •

मोठा फायदा झाला तो हा की, वाचनासाठी वेळ कसा काढावा हे मी त्यांच्याकडून शिकलो. त्यांचे सततोद्योगी जीवन आणि त्यातूनही वाचनासाठी ते काढीत असलेले क्षण मी पाहिले की, वाचायला वेळच नाही ही माझी सबबच मुळी थिटी पडत असे. वाचनासाठी वेळ कसा काढावा, याचे त्यांनी मला जणू समर्पक उत्तरच देऊन ठेवले होते.

अर्थातच झोपी जाण्यापूर्वीचाच पधरा मिनिटे प्रत्येकाला साधता येतील किंवा साधली पाहिजेत, असे नव्हे. दिवसभराच्या चोवीस तासांच्या अवकाशात आपल्या सोयीनुसार ही पधरा मिनिटांची सवड केव्हाही काढता येईल. पण ती नियमित मात्र काढली पाहिजे. या नियमित पधरा मिनिटांशिवाय दिवसभरात आणखीही कितीतरी फुरसतीचे क्षण मधून मधून आपल्या हाती लागतातच त्याचाही आपल्याला अधिक वाचनासाठी उपयोग करून घेता येईल.

मात्र हे क्षण साधण्यासाठी आपणास पुस्तके सतत जवळ बाळगावी लागतील. कारण असले क्षण केव्हा येतील ते काही सांगता येणार नाहीत. खाणावळीत गेल्यावर पक्तीत नबर लागेपर्यंत होणारा खोळंबा, डॉक्टरांच्या दवाखान्यात आपली पाळी येईपर्यंतचा वेळ, केस कापून घेण्यासाठी वाट पाहात बसताना, नाट्यगृहात पडदा वर जाईपर्यंतचा वेळ किंवा आगगाडीतील रोजचा अर्ध्या तासाचा जाता येतानाचा प्रवास, हा सारा वेळ मनात आणले तर आपण वाचनाच कामी लावू शकतो. 'ते' कुणी म्हणेल, 'हे तुमच काही तरीच सांगणं. अशा फुरसतीचा खरोखरच वाचनासाठी कधी उपयोग होऊ शकेल काय ?'

'का नाही ?' श्रीमती दुर्गाबाई खोटे यांचे उदाहरण इथे सांगण्यासारखे आहे. एरवी त्यांचे वाचन तर चालू असतेच पण रंगभूमीत कामाला जातानासुद्धा त्या एकदोन पुस्तके बरोबर घेत मेकअप करून

सेटवर असतानाही मधूनच मिळणारा वेळ गप्पासप्पात न घालविता त्या वाचीत राहात. त्यामुळे त्यांचे वाचन अव्याहत चालू राही.

'आता सांगा, या लहान सहान पुरसतीच्या क्षणाचा फायदा घेतल्यामुळे वर्षभरातील आपल्या वीस पुस्तकांच्या संख्येत आणखी कितीतरी भर पडेल की नाही ?'

फक्त वाचायची इच्छा आणि पुस्तके हाताजवळ असली म्हणजे झाले. वाचनासाठी राखून ठेवलेल्या आपल्या पधरा मिनिटापैकी एकही क्षण पुस्तके धुडाळण्यात वाया जाता कामा नये हा गोष्ट मी कटाक्षाने पाळतो. बाहेर जातानाही मी पुस्तके बरोबर घ्यायला विसरत नाही, याचे कारण तरी हेच घरीसुद्धा टेबलावर बैठकीच्या जागी आणि झोपण्याच्या जागेजवळ एखादे दुसरे पुस्तक नेहमी हाताशी राहील, अशी मी काळजी घेत असतो, तीही याचसाठी.

वाचायला वेळच होत नाही, असं म्हणणाऱ्या माझ्या कित्येक मित्राना माझा हा रोज पधरा मिनिटाचा फार्म्युला आता खूपच पटला आहे. एक-दोघानी आपण वर्षभरात खरोखरच वीस पचवीस पुस्तके वाचू शकलो असे प्राजलपणे कबूल केलं आहे त्यानी आपला हा नियम जर असाच चालू ठेवला तर वाचायला वेळच नाही, असं म्हणणारे माझे हे मित्र काही काळाने खरोखरच बहुश्रुत किंवा ज्यानी खूपच वाचन केलेले आहे अशा लोकात मोडतील यात सशयच नाही.

• • •

प्रकरण आठवे

# मी जमविलेली पुस्तके

'मी जमवलेली पुस्तके' याऐवजी 'माझा पुस्तकसंग्रह' असे चांगले सुटसुटीत नाव या प्रकरणाला का देत नाही! असे माझ्या एका मित्राने सुरवातीलाच विचारले होते 'त्याचं असं आहे' मी त्याला म्हटले, 'मी जमविलेल्या पुस्तकांची संख्या जरी बरीच असली तरी पुस्तकसंग्रह म्हणण्याइतकी काही ती विपुल नाही दुसरे म्हणजे या पुस्तकांपैकी काही पुस्तकांबद्दलच्या माझ्या मनातील भावना अगदी जिव्हाळ्याच्या आहेत त्यांतील काही मला अजूनही जिवलग मित्रासारखी वाटतात काही गुरुजनांचे जागी आहेत आणि काही पुस्तके जमा करताना किंवा मिळविताना मला आलेले अनुभव मजेचे आहेत.'

पुस्तके जमविण्याचा नाद मला नक्की कसा व केव्हा लागला हे काही सांगता येत नाही वाचनाची आवड मात्र अगदी लहानपणी मराठी शाळेत असतानाच मला लागली. लहानपणी वाचलेले एक पुस्तक मला अजूनही आठवते, ते म्हणजे गोविंदाची गोष्ट हे होय. ते वा गो. आपटे यांनी लिहिलेले आहे की, शिवरामपंत परांजप्यांनी, ते मला आता आठवत नाही पण यांच्यापैकी ते कुणीतरी लिहिले असावे असे वाटते.

आता एखाद्या ग्रंथपालाकडून ते कुणी लिहिले आहे ते शोधून काढता येईल, नाही असे नाही. पण या प्रकरणासाठी त्याची काही विशेष जरुरी आहे असेही नाही.

आमच्या शेजारी राहणाऱ्या, माझ्यापेक्षा वयाने किंचित मोठ्या असलेल्या एका मुलाकडून मी ते आणले होते आणि मला ते इतके आवडले की, ते त्याला परत करण्याची मला इच्छाच होईना. तथापि त्या मुलानेही ते दुसऱ्याकडून आणल्यामुळे ते परत करणे मला भागच होते. पण त्या पुस्तकाची मोहिनी काही विलक्षणच पडली होती माझ्या मनाला ! दुसऱ्या दिवशी सधी साधून मी ते पुस्तक पुन्हा त्याच्या दप्तरातून हळूच काढून घेतले व ठेवले दडवून !

दोन-तीन दिवसानी त्या पुस्तकाचा खरा मालक मुलगा जेव्हा ते परत मागायला आला, तेव्हा माझा शेजारी मुलगा ते दप्तरात शोधू लागला. पण ते सापडणार कुठले ! मी तर कानावर हात ठेवले. 'परवा मी परत दिले नाही का तुला, तुझ्या आईच्या देखत ?' मी त्याला आठवण दिली. त्याने घरभर ते पुस्तक शोधले. तो अगदी रडकुडीस आला. त्याच्या आईने त्याच्या पाठीत रपाटे घातले. त्याची केविलवाणी स्थिती पाहून मला वाईट वाटले. पण इलाज उरला नव्हता. जर मी ते पुस्तक तेव्हा बाहेर काढले असते तर मग माझ्या आईने माझ्या पाठीचे धिरडेच केले असते. शेजाऱ्याने खाल्लेला मार मुकाट्याने बघत बसण्यापलीकडे मला दुसरे काहीच करता येण्यासारखे नव्हते. त्या मुलाच्या आईने मग ते प्रकरण कसे तरी मिटवले व गोविंदाच्या गोष्टीचे ते पुस्तक माझ्या दप्तरात कायमचे जमा झाले.

मी जमा केलेल्या पहिल्या पुस्तकाची हकीकत ही अशी आहे. लहानपणी हस्तगत केलेल्या आणखी एका पुस्तकाची आठवण मला

आहे मराठी शाळेत वार्षिक परीक्षेत पास झाल्याबद्दल त्यावळी मुलाना पुस्तके बक्षीस मिळत एका साली आमच्या वर्गाला जी पुस्तके बक्षिसादाखल मिळाली, त्यातील एक चागले ३ ४ श पानाचे लठ्ठ पुस्तक मला मिळाले मला आठवते – त पुस्तक महाराष्ट्र भाषाभूषण जानगावकराचे – महाराष्ट्र कविचरित्र असावे मुकुदराय, ज्ञानेश्वर वगैरेंची त्यात चरित्रे होती, पण त्या व्हान वयात बक्षीस मिळालेल्या त्या लठ्ठ पुस्तकाच मला मुळीच आकर्षण वाटले नाही मला त्यात मुळी काही समजण्यासारखे नव्हतेच उलट माझ्यापेक्षा कमी मार्क मिळालेल्या एका मुलाला परी कथाचे, सुदर चित्रे असलले सहा आण्याचे जे पुस्तक बक्षीस मिळाल त्याबद्दल मला फार वैषम्य वाटले त्याचे ते पुस्तक मी वाचून काढले, पण ते परत करण्याचे माझ्या मनात यईना मी त्याला म्हटले, " हे पुस्तक ठेऊन, माझ जाड पुस्तक तू घेतोस का ? "

का कुणास ठाऊक, तो मुलगा लागलीच त्याला कबूल झाला अदलाबदलीत परींच्या गोष्टींचे ते सुदर पुस्तक मी मिळविले आपले सुरख पुस्तक इतक्या सहजासहजी द्यायला ता मुलगा कसा तयार झाला त मला त्या वळी कळले नाही तो मुलगा माझ्यापक्षा वयान मोठा हाता ह खरे, पण माझ जाड आणि जड पुस्तक वाचून ते समजण्याइतक काही त्याचे वय नव्हत पण मग कळल क, तो अशी पुस्तके मिळवून जुन्या दुकानात विकी. माझ्या त्या जाड पुस्तकाची किंमत अर्थातच त्याच्या परींच्या पुस्तकापेक्षा कितीतरी अधिक यईल ही खात्री असल्यामुळे ते परीचे पुस्तक त्यान मला हसत हसत दिले होते त्याच गुपित ह असे होते पण जाऊ दा !

वाढत्या वयाबरोबर माझा वाचनाचा नाद वाढतच गेला आणि त्याबरोबरच पुस्तक जमविण्याचाही ! त्य नतर मी जमा कलली तीन

पुस्तके मला आठवतात. पण त्याबद्दलसुद्धा मला असाच मार खावा लागला होता. त्यावेळी चित्रमयजगत् हे फार लोकप्रिय मासिक होते. त्यात येणाऱ्या क्रांतिकारकांच्या गोष्टी वाचण्यात मी अगदी गुंग होऊन जात असे. अशा गोष्टींची पुस्तके नंतर चित्रशाळा प्रेसने प्रसिद्ध केली होती. त्या मासिकात त्या पुस्तकांच्या जाहिराती वाचून मला ती पुस्तके वाचण्याबद्दल मोठी उत्सुकता लागून राहिली होती. विकत घ्यावी म्हटले तर पैसे आणायचे कुठून? कितीतरी दिवस मला त्या पुस्तकांच्या निव्वळ जाहिराती वाचण्यावरच समाधान मानावे लागे. पण अखेर ती पुस्तके वाचण्याची उत्कंठा अनावर झाली. मी माझ्या शालेय पुस्तकांपैकी आठवल्यांचा आलजेब्रा व गोखल्यांचे गणिताचे पुस्तक ही परीक्षेनंतर विकली आणि ती विकून आलेल्या पैशातून माणिकतोळा बॉंब केस, क्रांतिकारकांचा इतिहास व शौकत उस्मानीचे देशत्यागाचा इतिहास ही तीन पुस्तके विकत घेतली पण अभ्यासाची पुस्तके विकल्याचे फार दिवस दडून राहणे शक्यच नव्हते. आणि जेव्हा ते उघडकीला आले तेव्हा माझ्या वृद्ध चुलतीने संतापाने माझ्या पाठीत रपाटे घातले संतापणार नाही तर काय करील बिचारी? काबाडकष्ट करून ती मला सांभाळीत होती, शिकवीत होती. मी अभ्यासाची पुस्तके विकून जर गोष्टीची पुस्तके खरेदी करू लागलो तर ती तरी बिचारी काय करील!

पण तेवढ्याने, पुस्तक विकत घेण्याचा किंवा जमविण्याचा माझा छंद काही बंद पडला नाही. उलट तो वाढतच गेला काही दिवसापूर्वी पणजी जाऊन राहण्याचा मला प्रसंग आला त्यावेळी जमविलेल्या सर्व पुस्तकांचा मी सहज आढावा घेतला. आणि मला आढळून आले की, सुमारे १२०० लहान-मोठी पुस्तके माझ्या संग्रही आहेत. अर्थातच

*वाचावयास नेऊन माझ्या मित्रानी परत न केलेली शे पन्नास पुस्तके* यात धरलेली नाहीत हे निराळे !

माझ्या मित्रानी परत न केलेल्या या पुस्तकाबद्दल मला कधीकधी हळहळ वाटते. पण मला त्याचा राग मात्र येत नाही पुस्तके ही नुसती ठेवण्यासाठी नसतात, तर ती वाचण्यासाठी असतात, हे मला पटते ग्रथालय शास्त्रातील पाच मूलभूत तत्त्वापैकी एकाचा यासाठी निर्वाळाही देता येईल. शिवाय मी तरी कित्येक मित्राकडून आणलेली पुस्तके कुठे परत केली आहेत, किंवा करतो ! माझ्या सग्रहातील पुस्तकाचा जेव्हा मी वरीलप्रमाणे आढावा घेतला, तेव्हा माझे मित्र सदानंद रेगे, वसतराव आबेरकर, डॉ. माल्डकर, चित्रकार शुक्ल आणि इतरही काही मित्राची नावे असलेली काही पुस्तके त्यात सापडली. अर्थात ही मी त्याच्याकडून वाचायला म्हणून आणलेली पण परत करायची राहिलेली होती यात शका नाही.

तथापि माझ्या सग्रहातील सगळीच पुस्तके काही मी अशी मारलेली नाहीत. काही *माझ्या लेखक व प्रकाशक मित्रानी मला भेटीदाखल दिलेली* आहेत आणि माझे लेखन आवडणाऱ्या काही अपरिचित वाचकानीही मला त्या विषयावरील पुस्तके आपणहून पाठवून दिलेली आहेत.

वाचनाची आवड असलेला माणूस आपल्या आवडीच्या विषयावरील पुस्तकाचा सग्रह करणे साहजिक आहे. पण माझ्या सग्रहातील पुस्तकाचा जेव्हा मी आढावा घेतला तेव्हा मला आढळून आले की, मी कुठल्याही एका विषयावरील पुस्तकाचा पद्धतशीर असा सग्रह केलेला नाही. माझ्या सग्रहात नाना तऱ्हेच्या विषयावरील पुस्तके आहेत. इतिहास, भूगोल, प्रवास, कला, शिल्प, शास्त्र. शरीर विज्ञान, पशुपालन, खेळ, व्यायाम, चरित्र, शिकार वगैरे विषयावरील कितीतरी पुस्तके मी जमवि-

लेली दिसतात. कथा, कादंबऱ्या, नाटकाची पुस्तकेही मला वर्ज्य नाहीत. पण माझ्या संग्रहातील इतर पुस्तकाच्या मानाने त्यांची संख्या फारच थोडी असेल.

पण मौज अशी की, या थोड्या पुस्तकांपैकीच अधिक पुस्तके माझ्या मित्रानी वाचायला नेऊन परत दिलेली नाहीत. मला आठवते, र. वा. दिघे यांच्या घरी मी खोपोलीस गेलो असता त्यांनी आपल्या बारा, चौदा पुस्तकांचा एक गटच्या गट मला स्नेहभावाने नजर केला होता. त्यांची स्वाक्षरी असलेले त्यातील प्रत्येक पुस्तक मला अभिमानाचे वाटे. पण मी वर उल्लेख केलेल्या आढाव्याच्या वेळी मला आढळून आले की, त्या चौदा पुस्तकांपैकी, 'गातात आणि नाचतात, धरतीची लेकरे' हे त्यांच्या ग्रामीण गीतांचे केवळ एकच एक पुस्तक माझ्या संग्रहात शिल्लक उरले आहे. पुस्तके मित्राना वाचावयास देण्याच्या माझ्या वाईट खोडीबद्दल, त्या क्षणी मला स्वतःचा विलक्षण राग आला. आढावा घेण्याच्या कामी माझ्या साहाय्यास आलेल्या मित्राच्या अंगावर मी पुस्तक भिरकावले नि म्हटले, "हे पुस्तक तरी कशाला उरले आहे इथे? हे तू घेऊन जा."

माझ्या मित्राने ते पुस्तक उचलले, चाळले, नि तो म्हणाला, "हे कवितांचे पुस्तक आहे, हे मला कशाला ?"

"हं" मी दुःखित स्वरात म्हणालो, "ते कवितांचे आहे म्हणूनच तर ते उरले. नाहीतर दिघ्यानी दिलेल्या पुस्तकाच्या स्नेहपूर्ण भेटीचे इथे नाव निशाणही उरले नसते !"

ते पुस्तक मी उचलले, त्याची पाने चाळू लागलो. पानापानाबरोबरच माझ्या मनात जुन्या सुखद आठवणी येऊ लागल्या. 'रें रें भेकरी' आणि 'खुजबुज, खुजबुज रे' ही त्यातली गाणी माझ्या नजरेसमोर आली आणि दिघ्यांच्याकडे पाहिलेला मुलांचा नाच आठवला.

सदानंद रेगे, मी, मंगेश पदकी, राम सरदेशमुख असे आम्ही चार पाच मित्र एकदा खंडाळ्याच्या घाटात सहलीस गेलो होतो घाट उतरून पायथ्याजवळच्या विहारीत दिघ्याच्या निवासस्थानी आम्ही सायंकाळी येऊन पोचलो खेड्यातील आपल्या घरी साहित्याची आवड असलेली एवढी माणसे एकदम आल्याबद्दल दिघ्याना आनंद झाला काव्यशास्त्र विनोदात दोन दिवस कसे गेले ते कळलेही नाही. त्याच्याकडून परतण्याच्या आदल्या दिवशी सायंकाळी त्यानी एक मजेदार कार्यक्रम घडवून आणला. विहारीच्या शाळेतील काही मुलानी ग्रामीण गीते गाऊन दाखवली व त्याच्या तालावर नृत्येही केली त्यानी ! त्याचे हावभाव मोहक होते. धर्तीची लेकरे मधील 'रें रें रें भेकरी' आणि 'खुजनुज खुजनुज रे' ही दोन गाणी म्हणायला व रानातील भेकराचे हावभाव करायला त्यानी सुरुवात केली माझ्या साहित्यिक मित्राना तो नाच कितपत आवडला मला माहीत नाही पण शिकारीच्या निमित्ताने मी अनेकदा रानात जात असल्यामुळे भेकऱ्याची रानात होणारी हालचाल माझ्या चागली परिचयाची होती भेकऱ्या कशा लाजत लपत जातात, वेड्यासारख्या एखाद्या गोष्टीकडे कशा बघत राहतात, वेळी कशा झुजतात हे मी पाहिलेले होते ती मुले गाणे गात भेकरींच्या हालचालींचे अनुकरण करू लागली.

नका धावू , नका पळू
पाडसानो, कळपात या
जमा जमा हळूहळू
नका देऊ कोणा पळू
पाय नका वाजवू रे
कडे करा, या

भेकरींच्या हालचालींच समरसतेने गायलेले ते वर्णन माझ्या मनाला

पूर्ण मिटले होते. आता माझ्या संग्रहात उरलेले दिग्यांचे ते एकच एक पुस्तक उलगडताना ती जुनी स्मृती मला जाणवली.

त्या दिवशी आढावा घेता घेता, माझा मित्र हातात आलेल्या एका पुस्तकाचे वेष्टण झाडीत मला म्हणाला, "तू इतकी पुस्तके विकत घेतोस खरी, पण त्याची काळजी काही तू घेत नाहीस. या पुस्तकाच्या मुखपृष्ठावरील चित्र पाहा किती आकर्षक नि सुंदर होते ते. तू याला कव्हर घालतास तर ते असे फाटले असते का ?"

मला हसूच आले. "छे, बुवा !" मी त्याला म्हटले, "सुंदर पुस्तकांना असे कव्हरात गुंडाळून ठेवणे मला आवडत नाही खरे. एखाद्या सुंदर रमणीच्या मुखावर बुरख्याचे अवगुंठन घालून तिच्या सौंदर्याची अवहेलना करावी तसे वाटते मला त्यात !" यावर आम्ही दोघेही हसलो.

पुस्तके मी मुख्यतः दोन उद्देशांनी विकत घेत आलो आहे. एक गरजेपोटी. गरजेपोटी म्हणजे असे : मला एखाद्या विषयावर लिहायचे असले तर त्यासाठी तांत्रिक व इतर माहिती मिळविण्यासाठी मी अनेकदा पुस्तके विकत घेतो. माझ्या संग्रहात प्राचीन नाण्यापासून, आधुनिक केशभूषेपर्यंतच्या अनेक विषयावरील पुस्तके जी दाखल झालेली आहेत त्यांचे कारण हेच !

लेखनकामासाठी नव्हे, परंतु माझ्या आवडीचे विषय वाचायला मिळतात म्हणून मी कधी कधी पुस्तके विकत घेतो.

बुटल्याही दृष्टीने का होईना, पण मी पुस्तके घेतो ती पुष्कळदा त्यावरील परीक्षणे वाचून, पुस्तकांच्या दुकानात जाऊन, पुस्तके हाताळून, चाळून, त्यांची बुक जाकिटे वाचूनही मी पुस्तके घेतो. मित्र-मंडळींतील

गप्पागोष्टींचे अगर चर्चा-संवादाच्या वेळी पुस्तकावरील अभिप्राय किंवा माहिती ऐकूनही मी कित्येक-वेळा पुस्तके खरेदी करतो. अशा एका पुस्तकाची आठवण कित्येक वर्षे झाली तरी मला अजून येत आहे. जॉर्ज सावाचे 'हिलींग नाईफ' हे ते पुस्तक होय.

माझे मित्र श्री. वसंतराव आवेरकर यांच्या स्टुडिओत गप्पा मारताना आवेरकरांनी प्रथमच सावाच्या नावाचा उल्लेख केला. "सावाचे हिलींग नाईफ तुम्ही वाचलेत का?" त्यांनी मला विचारले. "नाही" मी म्हटले, "सावा नावाच्या लेखकाचे कुठलेच पुस्तक मी वाचलेले नाही."

"वा, त्याचे हिलींग नाईफ हे एकच एक पुस्तक मिळेल तिथून मिळवून तुम्ही वाचा!" आवेरकर म्हणाले. त्यांनी नंतर त्या पुस्तकातील शस्त्रक्रियेबद्दल वर्णन इतक्या रसिकतेने व हळुवारपणे केले की, ते ऐकल्यावर सावाचे ते पुस्तक वाचण्याची आत्यंतिक उत्कंठा मला लागून राहिली. त्यानंतर कित्येक दिवस मी ते पुस्तक वाचनालयातून व पुस्तकांच्या दुकानातून शोधीत होतो, पण ते मिळेना. माझी उत्कंठा त्यामुळे सारखी वाढत राहिली.

एके दिवशी पुस्तकाची खरेदी विक्री व देवघेव करणारे माझे एक स्नेही माझ्या ऑफिसात आले. त्यांनी म्हटले, "तुम्हाला हवे असलेले सावाचे पुस्तक आता इंटर-नॅशनलमध्ये ठेवलेले आहे. फक्त दोनच प्रती आहेत तिथे" ती बातमी ऐकून मी एकदम उतावळा झालो. पण खिशात तर पैसे नव्हते. माझे स्नेही म्हणाले, "त्या प्रती अगदी डी लक्स आहेत. साडे सहा रुपये त्याची किंमत आहे प्रत्येकी."

मी म्हटले, "पण आता या वेळी मजकडे पैसे नाहीत. तुम्हीच एक प्रत विकत घेऊन मला द्या ना, नेहमीप्रमाणे!"

"माझीही तीच गत आहे. नाहीतर पुस्तक विकत घेऊन मला नसते का २० टक्के कमिशन काढता आले!" माझे स्नेही थट्टेने म्हणाले.

क्षणभर काय करावे ते मला कळेना. इतके दिवस आपण ज्याच्या शोधात होतो, ते पुस्तक विक्रीसाठी आले असताना, खिशात पैसे नसावेत याचे मला दुःख झाले. ऑफिसातील सहकाऱ्याकडे मागावेत तर तेही माझ्यासारखेच. साडेसहा रुपये आता आयत्या वेळी कोण उसने देणार? आमच्या सुपरिंटेंडेंटकडे मागावे तर मिळतेही, पण त्याच्याकडे पैसे उसने मागावेत की कसे याचा मला प्रश्न पडला. पण अखेर पुस्तक हस्तगत करण्याची इच्छा उसळून आली आणि मी आमच्या सुपरिंटेंडेंटना म्हटले, 'मला आता साडेसहा रुपयाची जरुरी आहे.'

त्यांनी काही न बोलता दहा रुपयाची नोट काढून माझ्या हाती दिली. पैसे हाती पडताच मी मागे न पाहता इंटरनॅशनलकडे धावत गेलो आणि माझ्या मित्राने सांगितलेल्या खुणाच्या अनुरोधाने धावत जाऊन ते पुस्तक उचलले नि काऊंटरवर जाऊन त्याचे पैसे भरले. माझ्या मित्राने सांगितले होते की, दोन प्रती तेथे विक्रीसाठी ठेवल्यात म्हणून. पण मी गेलो तो हीच एक प्रत तिथे शिल्लक होती. काऊंटरवरील विक्रेता हसला. तो म्हणाला, 'तुम्ही लकी आहात. आता हे पुस्तक तीन-चार महिने तरी विक्रीसाठी येणार नाही. आमच्याकडील शेवटची प्रत तुम्ही मिळवलीत.'

मी पुस्तकाचे पार्सल काखेत मारून ऑफिसात आलो. सुपरिंटेंडेंट म्हणाले, "का हो, धावत काय आहे एवढी?"

मी म्हटले, "गेले सहा महिने मी शोधात असलेले एक पुस्तक आता अचानक हस्तगत झाले. आणखी दहा मिनिटे मी तिथे जातो ना

तर ही प्रतसुद्धा विकली गेली असती. " माझे पुस्तकांचे हे वेड पाहून सुपरिंटेंडेंट हसले.

पुस्तकाचे ते पुडक उघडून चाळण्याची मला राहून राहून इच्छा होत होती. पण मी ती आवरली. आवेरकरांनी केलेल्या त्याच्या वर्णनावरून ते पुस्तक एकदा उघडल्यावर पुरे केल्याशिवाय मिटणे कठीणच होते. ऑफिस केव्हा सुटते व मी घरी जाऊन त्या पुस्तकाचा केव्हा फडशा पाडतो असे मला झाले होते. पत्नी व मुलगा गावी असल्यामुळे, वाचनात व्यत्यय येण्यासारखे काही कारण उरलेले नव्हते. घरी जाऊन परत यायला नको म्हणून वाटेतच मी खाणावळीत जाऊन जेवलो, आणि रात्री साडेआठच्या सुमारास दारे, खिडक्या लावून स्वस्थपणे पुस्तक घेऊन अंथरुणावर पडलो.

आवेरकरांनी त्या पुस्तकाची का स्तुती केली होती हे पुस्तक वाचायला सुरवात करताच मला कळून आले. प्रत्येक पानागणिक—आणि पुढे ? असे कुतूहल मनात उभे राहायचे आणि नजर पुढील पानावर आपसूक वळायची.

मध्यरात्रीचा एक दीडचा सुमार झाला होता. पुस्तकात एके ठिकाणी एका वेड्याने शहाण्या डॉक्टराची उडवलेली भंबेरी, तेवढ्यात माझ्या वाचनात आली. आणि मी खो खो हसत सुटलो. हसे मला आवरेच ना ! पलीकडच्या खोलीत माझे मामा झोपी गेले होते ते माझ्या हसण्यामुळे जागे झाले त्याना वाटले, मी झोपेत हसत आहे. त्यांनी मला हाका मारायला सुरवात केली तेव्हा कुठे मी भानावर आलो. मामा म्हणाले, " अरे, असा हसतोस काय वेड्यासारखा ? "

त्यांच्या तोंडून अनाहूतपणे आलेला वेड्याचा उल्लेख ऐकून मी आणखीनच हसलो. त्या दिवशी सर्व रात्रभर मी ते पुस्तक वाचत होतो. पहाटेच्या सुमारास ते संपले तेव्हा कुठे मी ते खाली ठेवले.

धावत जाऊन विकत आणलेल्या व आधाशासारखे वाचून संपविलेल्या त्या पुस्तकाची ती पहिली प्रत आता माझ्या संग्रही नाही. कुणी मित्राने ते पुस्तक वाचायला नेले व ते तो मला परत करायला विसरला. ते पुस्तक हरवल्यामुळे मला अजूनही हळहळ वाटते. खरे म्हटले तर त्या पुस्तकाचा मराठीत संक्षेप करून, त्यासाठी खर्चलेल्या पैशांपेक्षा अधिक पैसे मी मिळवले. त्या दृष्टीने त्याची किंमत भरून आली असे कुणी म्हणेल. पण त्या पुस्तकाबद्दलच्या माझ्या मनात निर्माण झालेल्या आपुलकीच्या भावना, त्याचे काय? एकदा वाचून झालेले पुस्तक मी सहसा कधी परत खरेदी करीत नाही. पण सावाच्या त्या पुस्तकाची मोहिनी मोठी विलक्षण होती. आपल्या संग्रही ते पुस्तक कायम असावे म्हणून मी पुन्हा एकदा ते विकत घेतले. पण यावेळी मात्र त्याची स्वस्त प्रत घेतली आणि त्या पुस्तकाची मी आता कुणा मित्राजवळ चुकूनही स्तुती करीत नाही. कारण त्यामुळे ते पुन्हा एकदा हरवण्याचा खास संभव आहे.

एखादे पुस्तक मला अतिशय आवडले की, ते लिहिणाऱ्या ग्रंथकाराची दुसरी पुस्तके मी लागलीच मिळवून वाचतो, किंवा विकत घेतो. सावाचीसुद्धा, ए रींग ॲट द डोअर, द्वाईस द क्लॉक राउंड, ए डॉंकी सिरीनेड, सर्जेन्स सिंफनी वगैरे पुस्तके मी विकत घेतली. पण यातील एकालाही त्याच्या हिलींग नाईफची काही सर नाही.

त्याची एक-दोन पुस्तके तर मी विकत घेतल्यावर नुसती चाळून तशीच ठेवून दिली आहेत. सावाचीच नव्हेत तर अशी अनेक पुस्तके माझ्या संग्रही आहेत की, ती घेऊन, पुढे कधी तरी सवडीने वाचू म्हणून मी ठेवून दिली आहेत. ती वाचायला मला अजूनही सवड होत नाही. पण ती कधी तरी वाचू या कल्पनेच्या आनंदातच मी त्यांच्याकडे अधूनमधून दृष्टिक्षेप टाकतो व ती पुन्हा जागेवर ठेवून देतो.

खरं म्हटलं तर जीवनाच्या धकाधकीत आता मला वाचन करायला मिळतच नाही. वाचनासाठी हवा असलेला वेळ, स्वस्थता व जागेची सोय मला मिळू शकत नाही. ऑफिसात जाताना गाडीत मिळणारा सकाळचा अर्धा-पाउण तास व परतताना सायकाळचा तेवढाच वेळ, हाच काय तो आता माझ्या वाचनासाठी ठरलेला वेळ झाला आहे.

यामुळे एकाच वेळी दोन किंवा तीन पुस्तकें मी एकदमच वाचायला सुरुवात करतो ती बहुधा निरनिराळ्या विषयावरील असतात आणि माझ्या त्या त्या वेळच्या मन स्थितीला पोषक असं त्यातील एखाद्या पुस्तकाचे वाचन मी सुरू करतो एकच पुस्तक एकसारखे वाचल्यामुळे येणारा कटाळा त्यामुळे मला येत नाही

सावाच्या पुस्तकाप्रमाणेच माझ्या मनाची विलक्षण पकड घेणारी आणखी एक-दोन पुस्तके माझ्या सग्रही आहेत. जेम्स हिल्टनचं 'बुदाऊट आरमर' हे एक व दुसरे टिकेकराचे 'सरकार व सरदेसाई' हे होय

टिकेकराच्या पुस्तकावरील परीक्षण वाचून मला त्या पुस्तकाबद्दल आकर्षण वाटले आणि सधी मिळताच मी ते खरेदी केले त्याची पहिली काही पाने मी झपाट्याने वाचून काढली पण टिकेकराचे ते पुस्तक मला इतके आवडले की, न जाणो ते पुस्तक भराभर वाचून लौकर पुरे होईल आणि ते वाचण्याच्या आनदाला मी लौकर मुकेन या कल्पनेनेच मी माझा वेग आवरला. आणि अगदी सावकाश व काटकसरी वृत्तीने मी ते वाचू लागलो.

टिकेकराचे ते पुस्तक वाचताना काही जुन्या स्मृती मनात आल्या. सरकाराना पाहण्याची अगर भेटण्याची सधी मला कधीच आली नाही. 'औरंगजेबाच्या आख्यायिका' हे त्याचे एक पुस्तक माझ्या सग्रही आहे हाच त्याचा माझा सबध पण सरदेसायाना दोनदा

भेटण्याची व एक-दोन पत्रे लिहिण्याची मला संधी मिळाली होती. बऱ्याच वर्षांपूर्वी श्री शंकरराव किर्लोस्करांनी मला एक पत्र लिहून रियासतकारांना कामशेत येथे जाऊन भेटण्यास सुचवले होते. उमाजी नाईकाच्या बंडाबाबत काही अप्रसिद्ध माहिती त्यावेळी सरदेसाई यांना उपलब्ध झाली होती. पण त्यावेळी त्यांची प्रकृती किंचित बिघडली असल्यामुळे, कामशेतला जाऊन ते सांगतील तो मजकूर मी किर्लोस्कर मासिकासाठी उतरून घ्यावा, असे शंकरराव किर्लोस्करांनी मला सुचविले होते त्याबाबत मी सरदेसाई यांना भेटलो असता त्यांनी माझ्यासारख्या नवख्या लेखकाबद्दल दाखविलेली आस्था व आपुलकी अजूनही माझ्या मनात आहे.

मागे एकदा टाईम्समध्ये एका वाचकाचे पत्र आले होते. त्याने एका पारशी लेखकाने लिहिलेल्या शिवाजी महाराजाच्या चरित्राची थोडी माहिती दिली होती. त्याबद्दल कुतूहल वाटून मी रियासतकारांना एक पत्र लिहिले होते. रियासतकारांनी लगलीच एक छोटासा लेखच उत्तरादाखल लिहून पाठवला. तो लेख नंतर आम्ही बा. द. खडप्यांच्या ' वीणा ' मासिकात प्रसिद्ध केला. लेखनाबाबत रियासतकार कुणालाही साहाय्य करावयास तत्पर असत या टिकेकरांच्या प्रतिपादनाचा अनुभव मला असा प्रत्यक्ष आला होता.

माझ्या संग्रहातील अनेक पुस्तकांच्या पुनर्दर्शनामुळे अशा अनेक स्मृती अधून मधून माझ्या मनात जागृत होतात अपटन् सिंक्लेअरचे ' नो पासारा ' हे पुस्तक माझ्या संग्रहात आहे. १९३७-३८ सालच्या स्पॅनिश अंतर्गत यादवीच्या पार्श्वभूमीवरील ही कादंबरी त्यावेळी जगभर एकदम गाजली होती. मनोहरच्या आकाशवाणीत प्रो. फडक्यांनी केलेले या कादंबरीचे रसग्रहण वाचून, ती मूळ कादंबरी वाचण्याचा

मला मोह झाला होता. पण ते पुस्तक बरेच जुने होईतो माझ्या हाती पडले नव्हते. खरेदी करून वाचण्याइतकी माझी त्या वेळी सुस्थितीही नव्हती. पण उशीरा का होईना मला ते नंतर वाचनालयात मिळाले.

साधारणपणे एकदा वाचून झालेले पुस्तक मी सहसा खरेदी करीत नाही. कदाचित हा दुर्गुण असेल! पण सिंक्लेअरच्या या पुस्तकाबाबत मी माझा तो नियम मोडला. एकदा एका जुन्या पुस्तकांच्या दुकानात मी पुस्तके चाळीत असता, पिवळ्या वेष्टणातील हे पुस्तक माझ्या हाती आले.

माझ्या संग्रहातील पुष्कळच पुस्तके जुन्या पुस्तकांच्या दुकानातून मी खरेदलेली आहेत. अनेकदा चांगली नावाजलेली पुस्तके मला अशा दुकानातून स्वस्तात मिळालेली आहेत. पण ही दुकाने मात्र मला वारंवार बदलावी लागतात. कारण हे दुकानदार मला आता ओळखतात आणि मी निवडलेले पुस्तक चांगलेच असले पाहिजे अशा खुळ्या समजुतीने ते भुक्कड पुस्तकाची किंमतही खूप वाढवून सांगतात.

सिंक्लेअरचे ' नो पासारा ' हे पुस्तक त्या दुकानात दिसताच मी सहज उचलून चाळले, तो त्यावर जवाहरलाल नेहरूंच्या भगिनी कृष्णा हाथीसिंग यांची स्वाक्षरी मला आढळून आली. त्यांच्या संग्रहातील ते पुस्तक तिथे पाहून मला आश्चर्य वाटले व त्यावरील स्वाक्षरीसाठी ते मी विकत घ्यायचे ठरविले. त्या विक्रेत्याने त्याची दीड रुपया किंमत सांगितली. मी म्हटले, "हे दहा-बारा वर्षांपूर्वीचे पुस्तक आहे. या पुस्तकाला दीड रुपया कोण देणार. रुपया देतो मी!" तो म्हणाला, "नाही. रुपयाला नाही परवडणार! हे गाजलेले पुस्तक आहे." मी मनात म्हटले, "पुस्तकाची माहिती आहे तर तुला!" मी पुन्हा ठेवले व निघालो.

पण त्या पुस्तकाचे, विशेषतः त्यावरील स्वाक्षरीचे मला मोठे आकर्षण वाटले होते. मला घरी येववेना. पाच-एक मिनिटे चालल्यावर मला राहवेचना, मी परत त्या दुकानी आलो. मी म्हटले, "चल, दे ते पुस्तक!" त्याने ते पुस्तक उचलले. इतका लांब जाऊन मी ते पुस्तक घ्यायला परतलो हे पाहून त्याला संशय आला. त्याने ते पुस्तक उचलले नि माझ्याप्रमाणेच उलगडून तपासले. कृष्णा हाथीसिंग यांची सही माझ्याप्रमाणेच त्यानेही पाहिली व तो म्हणाला, "नहीं साब, अब तो दो रुपया पडेगा ये किताबका!"

काही न बोलता मी निमूटपणे खिशात हात घातला व दोन रुपये काढून त्याच्या स्वाधीन केले. आणखीन घासाघीस करायची तर पुस्तकाची किंमत तो अधिकच वाढवायचा ही भीती मनात आली.

त्या पुस्तकावरील कृष्णा हाथीसिंग यांची सही पाहिली की आता त्यांच्या भेटीची मला आठवण येते. ते पुस्तक विकत घेताना त्यांना कधी भेटण्याचा प्रसंग येईल असे वाटले नव्हते. नेहरू कुटुंबाची कहाणी नावाचा एक मोठा लेख कृष्णा हाथीसिंग यांनी मागे 'अमेरिकन जर्नल' मासिकातून लिहिला होता. या लेखाचा अनुवाद करण्याची परवानगी मिळावी म्हणून मी त्यांना एक पत्र लिहिले व त्यांनी मला त्यासाठी प्रत्यक्ष येऊन भेटा असे कळविले होते. मलबार हिल्वरील 'आनंदभवन' या नावाच्या त्यांच्या निवासस्थानी मी गेलो, तेव्हा सौ. कृष्णा व श्री. राजा हाथीसिंग या दोघानाही मला भेटता आले. त्यांनी माझे स्वागत केले खरे! पण त्यानंतर अर्धा तासपर्यंत त्यांनी मला इतके आणि असे काही प्रश्न मला विचारले की मी अगदी 'नर्व्हस' होऊन गेलो होतो. पण शेवटी अनुवादाची परवानगी मी त्यांच्याकडून

मिळवली. सौ. हाथीसिंग यांनी आपल्या लेखाची एक टंकलिखित प्रत मला दिली आणि मग कॉफी घेत आमच्या असातर गप्पा झाल्या.

"तुमची स्वाक्षरी माझ्या संग्रही आहे" असे मी सांगितले, तेव्हा त्यांना आश्चर्य वाटले. "केव्हा आणि कशी मिळवलीत तुम्ही माझी स्वाक्षरी?" त्यांनी विचारले. मी त्यांना 'नो पासारा' पुस्तकाची वरील हकीकत सांगितली. त्या हसल्या, "कुणी तरी वाचायला नेलेले ते पुस्तक परस्पर बाजारात गेले असावे!" त्या म्हणाल्या.

वर एके ठिकाणी मी म्हटले आहे की, कुठल्याही एखाद्या लेखकाच्या पुस्तकाचा मी रीतसर संग्रह केलेला नाही. पण माझा मित्र व मी मिळून घेतलेल्या पुस्तकांच्या आढाव्यात मला दिसून आले की काही लेखकांची बरीच पुस्तके मजकडे आहेत. मॉम, कराका, आर. के. नारायण व जिम कॉर्बेट या चौघाची बरीच पुस्तके मी गोळा केलेली आहेत.

मी स्वतः शिकारीबद्दल लिहीत असल्यामुळे कॉर्बेट याची पुस्तके मी कित्याच वेळा वाचून काढली होती. माझ्या एका रसिक मित्राने ती मला भेटीदाखल म्हणूनच दिलेली आहेत. पण कॉर्बेटच्या शिकारीवरील पुस्तकांपेक्षा त्याच्या 'जंगललोर' आणि 'माय इंडिया' या पुस्तकांनीच माझे मन अधिक आकृष्ट झाले होते.

मॉम तर माझा मोठाच आवडता लेखक! त्याची 'टायपेन' ही गोष्ट मी लहानपणी प्रथम वाचली. मलायातील रबर मळ्यातील एक उद्दाम इंग्लिश मळेवाल्याच्या जीवनावरील ती गोष्ट मला चित्तवेधक वाटली. आणि तेव्हापासून गेली २५ वर्षे मी मॉमची पुस्तके वाचीत व जमवीत आलो आहे. माझ्या थकल्या मनाला मॉमच्या पुस्तकांनी नेहमीच विरंगुळा दिलेला आहे. त्याची लिसा ऑफ लँबेथ, पेंटेड व्हेल, मून अँड सिक्स पेन्स, नॅरो कॉरनर, कॅटलीना, फूल्स अँड देअर फॉलीज, केक्स

अँड एल आणि इतर कितीतरी पुस्तके मी गोळा केलेली आहेत. त्याचं ' समिंग अप ' आणि दोन कथासंग्रह पण मजकडे आहेत. त्याच्या गोष्टींचा चटका विलक्षण आहे. त्याच्या गोष्टींपैकी ' अनकांकरेबल ' आणि ' मदर ' या गोष्टी अजूनही माझ्या मनात घर करून राहिलेल्या आहेत.

मॉमच्या आई ( मदर ) या गोष्टीप्रमाणेच आर. के. नारायण यांची ' आई ' ही गोष्टसुद्धा मला अजून आठवते. या गोष्टीमुळेच आर. कें.ची पुस्तकें मी मिळवून वाचू लागलो. त्यांची मिस्टर सपत, माल्गुडी डेज, फायनॅन्शियल एक्सपर्ट ही पुस्तके अजून मजकडे शिल्लक आहेत. त्यांच्या गोष्टी मला पूर्वी किती आवडायच्या! मला आठवते, ३३ किंवा ३४ सालचे ते दिवस असावेत. मद्रासच्या ' हिंदू 'च्या रविवारच्या पुरवणी अंकात आर. कें. ची एक कथा नियमितपणे प्रसिद्ध होई. मंगळवारी सकाळी हिंदूचा रविवारचा अंक त्या वेळी मुबईत येई. दर मगळवारी सकाळी मी माहीमहून दादरला पळत जायचा व सार्वजनिक वाचनालयात नुकताच आलेला हिंदूचा ताजा अक इतराच्या आधी हस्तगत करून त्यातील आर. कें. ची गोष्ट अधाशासारखा वाचायचा! माझ्या संग्रहात असलेली आर. कें. ची एक-दोन पुस्तके पाहिली की त्या दिवसांची आठवण माझ्या मनात उभी राहते.

मी जमविलेल्या पुस्तकाबद्दल आठवणी आठवू लागलो तर किती तरी सागता येतील, पण मग त्यासाठी एक स्वतंत्र पुस्तकच लिहावे लागेल. आणि असे पुस्तक लिहीपर्यंत आणखी किती तरी पुस्तके माझ्या संग्रही दाखल होतील. कारण, पुस्तके जमविण्याचा माझा छंद असाच अव्याहत चालू राहणार.

मला वाटते, नाटक, सिनेमा, रेडिओ, ग्रामोफोन, टेलिव्हिजन इत्यादी इतर कोणत्याही सावादिक साधनापेक्षा पुस्तकात काही विशेष गुणधर्म आहेत ते केव्हाही उघडून वाचता येते. पुन्हा पुन्हा त्याचा आस्वाद घेता येतो नको तेव्हा बाजूस ठेवता येते. त्याचा आकार व एकदर रचना सग्रहाला योग्य अशी असते, आणि विशेष म्हणजे पुस्तकाचा आनद लुटण्यासाठी इतर कुणावर अवलबून राहावे लागत नाही मी पुस्तके वेळी अवेळी जमा करतो त्याचे कारण हे होय.

• • •

प्रकरण नववे

# अशी पुस्तके ! ऐसे वाचक

( थोरामोठ्यांच्या वाचनविषयक आवडीनिवडी आणि आठवणी. )

डॉ वि. भि कोलते

ग्रंथवाचनाची आणि ग्रंथसंग्रहाची आवड खामगाव येथे असतानाच ल्हानपणी मला लागली. माझ्या खासगी ग्रंथसंग्रहालयातील पहिले पुस्तक मी खामगाव येथेच विकत घेतले १९२३ २४ च्या सुमारास गावातील धर्मशाळेच्या समोरून जाताना डॉ. काळे यांच्या दवाखान्या-समोर त्यांचे बंधू सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक ( कै ) यादव माधव काळे यांनी लिहिलेल्या 'वऱ्हाडचा इतिहास' या पुस्तकाची जाहिरात लावलेली मला दिसली आणि सवलतीची किंमत म्हणून हे पुस्तक दीड रुपयात देऊ केले होते. माझ्याजवळ इतके पैसे नव्हते जुळून मिळण्यासारखेही नव्हते. एकच मार्ग होता. आणि तो म्हणजे पोट बांधणे हा होय. वसतिगृहातील भोजनालयात काही दिवसांचे खाडे करून ही रक्कम मी मोठ्या मिनतवारीने जमा केली आणि ते पुस्तक विकत घेतले त्या पुस्तकाची स्मृती आली की आजही मला आनंद होतो त्या पुस्तकाची ती प्रत मी अजूनही माझ्याजवळ प्रेमाने बाळगून ठेवली आहे.

## प्रा मा दा अळतेकर

सन १९०० साळच्या जानेवारी महिन्यात न्यायमूर्ती रानडे वारले. मी त्या वेळी सुमारे दहा वर्षांचा होतो व वृत्तपत्रे वाचू लागलो होतो. त्यात रानड्यांच्या निधनाची हकीकत आली होती पुढ दोन-तीन महिन्यांनी आम्ही इंग्रजी पहिल्या इयत्तेतील चारपाच मुलांनी मिळून रानडे वाचन मदिर म्हणून छोटीशी सस्था काढली प्रत्येकाने चार-चार आणे वर्गणी काढली शिवाय प्रत्येकाने आपल्या घरातील चार पाच पुस्तकेही आणून दिली हातीमताई, गुल्बकावली, बारबल बादशहा, इसापनीती, ठकसेन राजपुत्राच्या गोष्टी अशासारखी दहावीस पुस्तक आम्ही एकत्र गोळा केली व आमचे वाचन मदिर सुरू केले आमची वर्गणी रुपया, दोन रुपये गोळा झालेली होती तेवढ्यात काय विकत घेणार?

महिनाभर विचार करून आम्ही ' बालबोध ' मासिक निर्णयसागर प्रेसकडून घ्यायचे ठरवले या मासिकाची वर्षाची वर्गणी आणे आठ, टपाल-खर्च वर्षाचा आणे तीन आणि मनिऑर्डरचा खर्च एक आणा, मिळून बारा आण निर्णयसागर छापखान्याकडे म ऑ ने पाठवले चार पाच दिवसांनी बालबोधचा एप्रिल १९०१ चा अक आमच्याकडे आला आमचा हर्ष काय विचारावा? आमच्यापैकी प्रत्येकाने तो डोळे भरून वाचला वर्गणी भरून आम्ही बालबोधचे वर्गणीदार झालो होतो ना?

## के श्रीपाद महादेव माटे

वाचनाचा छद मला पहिल्यापासूनच होता मी मराठी शाळत असतानाच पाडव प्रताप, हरिविजय, भक्तिविजय, पत्री माहात्म्य, गुरुचरित्र अशा किती तरी पोथ्या वाचलेल्या होत्या हा मुलगा फार

मला ल्हानपणी ललित वाङ्मय वाचण्याचा फार नाद अस केवळ आवडीने सस्कृत काव्ये व नाटके मी वाचली, पण पुढे त्याचा मनावर वाईट परिणाम होतो, असे वाटून मी ललित वाचन आग्रहान सोडून दिल

**डॉ के ना वाटवे**

ल्हानपणचे माझे वाचन जुन्या धार्मिक ग्रंथापुरतेच मर्यादित नव्हत *नवलकथा, नाटक, कादंबऱ्या, कथा असले लौकिक व तेव्हा चटोर समजल* जाणारे मराठी वाङ्मय मी चोरून वाचीत अस ठकसेन राजपुत्र, सिंहासन बत्तीशी, गुल्बकावली, हातीमताई, शारदा, सौभद्र, बायकाच बंड, कांचनगडची मोहना इ कथा, नाटके आणि उप काल सारख्या हरिभाऊंच्या कादंबऱ्या ही माझ्या वाचनात आलेली ठळक पुस्तके होत तात्याचा आमच्यावर मोठा दरारा असे त्यांची नजर चुकवून असले वाचन करणे कठीण पण आम्ही त करीत हातो

एकदा माझ्या हाती उप काल कादंबरी *लागली आणि तिची पकड* माझ्या मनावर इतकी बसली की, त्यापरते मला दुसरे काहीच सुचना ता ज्याच्याकडून मला मिळाला होती, त्यांच्याच घरी *मला त्या दिवशी* जेवायला जायचे होते वा ! नामी संधी मिळाली

मी सकाळची शाळा सुटताच रामभाऊंच्या माडीवरील खिडकी त जाऊन बसला व दार बंद करून अंधुक प्रकाशात उप कालातील अद्भुत कथा वाचू लागलो वाचताना अशा काही गूढ घटना एका मागून एक येऊ लागल्या की, मला वेळ काळाचे भान राहिले नाही नारा वाजले रामभाऊंनी एक दोनदा हाकाही मारल्या शेवटी त शोधीत माडीवर आले पाहतात तो मी वाचनात गुंग ! 'इतका काय वाचता आहस ? जेवायला चल ना !' असे जेव्हा त मला म्हणाले, तेव्हा कुठे मला शुद्ध *आली मी धाईधाईने जेवायला गेलो पण माझे जेवणाकडे लक्ष हात कुठे?*

**वि. द. घाटे :**

स्थळापेक्षा मला माणसे अधिक आवडतात आणि माणसापेक्षा पुस्तके! माणसापेक्षा पुस्तके जास्त आवडतात याचे कारण त्या पुस्तकात माणसे असतात. जीवनात धक्के मिळाले की, मी पुस्तकाकडे वळतो.

मेरी कॉरेली ही आमची त्या काळची आवडती लेखिका. तिचे 'सॉरोज ऑफ सेटन' हे भयंकर पुस्तक माझ्या हाती मी इंग्रजी सहावी, सातवीत होतो तेव्हा आले. मी त्या दिवशी कसाबसा जेवलो आणि जो पुस्तक वाचत बसलो तो ते संपेपर्यंत वाचतच होतो.

अगाथा खिस्ती मी आवडीने वाचतो. बार्थचे 'रिलिजन्स ऑफ इंडिया' वाचून डोके जड झाले की अगाथा खिस्तीचे पुस्तक मी उचलतो. ती कथा किती छानदार खून करते! मी तिच्यावर निहायत खूष आहे. तिने लिहिलेल्या खुनाच्या रहस्यकथा चहाच्या घोटाबरोबर मी शांतपणे वाचतो.

**कर्नल सूर्यकांत पंडित :**

कमिशन मिळाल्यानंतर डिनर नाईटच्या दिवशी पल्टणीच्या कमांडर ऑफिसरने मला मेसमधल्या प्रथाल्यात नेले आणि तेथील पुस्तकांनी भरलेली कपाटे दाखवली.

'*ही सारी पुस्तके मी वाचली आहेत.*' ते गंभीर पण गोड आवाजात म्हणाले, 'कित्येक पुस्तकात ठिकठिकाणी माझे विचार मी नोंदून ठेवले आहेत फावल्या वेळात ही पुस्तके तू वाचलीस तर तुला फायदा होईल'.

पण पुस्तके वाचायची की नाही हे त्यांनी मुळी आमच्या मर्जीवर सोडलेच नाही. प्रत्येक अधिकाऱ्याला प्रत्येक आठवड्यात ते कमीत कमी एक तरी पुस्तक वाचायचा हुकूम देत आणि पंधरवड्यातून एक दिवस,

प्रत्येकाला वाचलेल्या पुस्तकांचे सारांश थोडक्यात सांगावे लागत. हुकमी वाचन असे ते.

इष्टुर फाकडा :

मुंबई प्रांताचा पहिला गव्हर्नर माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन हा एकवीस वर्षे वयाचा असताना, त्याने असईच्या लढाईत भाग घेतला होता. त्याची वाचनप्रियता उल्लेखनीय असून लढाईच्या धामधुमीतही त्याचे वाचन चालूच असे. असईच्या लढाईनंतर आठच दिवसांनी त्याने आपल्या एका मित्राला पत्र लिहिले होते. त्यात तो म्हणतो, 'हल्ली मी शेक्सपीयर लक्षपूर्वक वाचत आहे. मला त्याचे जे पुस्तक मिळाले आहे ते नामी आहे. त्यात टीप म्हणून कशी ती दिलेलीच नाही. पण त्यामुळे मला कुठे काही अडत नाही'.

पुढे पुढे एल्फिन्स्टनसाहेब बाहेर फिरतीवर जात तेव्हा त्याच्याबरोबर दोन उंट पुस्तकांनी सक्त लादलेले असत आणि ती सगळी पुस्तके अशी नीट व्यवस्थेने लावलेली असत की, त्यातून जे पाहिजे ते वाटेल तेव्हा चटकन काढून घेता यावे.

इंग्रज मराठा युद्धात लेफ्टनंट जनरल ब्रिग्स हे एल्फिन्स्टनच्या हुकमतीत काम करीत. एकदा एल्फिन्स्टन फिरतीवर असताना ले. ज. ब्रिग्स त्यांना भेटायास आले असताना तिथे तंबूच्या एका कोनाड्यात मराठी पुस्तकांचा एक ढीग पडलेला त्यांना दिसला. त्यांनी एल्फिन्स्टनसाहेबांना विचारले, 'ही इतकी मराठी पुस्तके कशाला जमविली आहेत ?'

एल्फिन्स्टननी उत्तर दिले, 'एतद्देशीय लोकांना आधुनिक शिक्षण मिळावे म्हणून हा माझा सारा प्रयत्न आहे.'

ले. जनरल ब्रिग्स म्हणाले, 'त्यांच्या शिक्षणाची सोय करणे म्हणजे एका अर्थी आपण चंबुगबाळे उचलून युरोपला परत जाण्यासारखेच नाही का ?

'हो ना', एल्फिन्स्टन म्हणाले, 'माझा बाडबिस्तरा बांधायला सुरुवात करूनच मी हे धोरण स्वीकारले आहे. आणि माझ्या या उद्दिष्टात ही पुस्तके तुम्ही म्हणता तशी मदत खास करतील.'

**धर्मानंद कोसंबी :**

१८९२ सालच्या अखेरीस मला वाचनाची गोडी लागू लागली. असे होण्यास कुणी प्रवर्तक झाला नाही. आपोआपच माझे लक्ष वाचनाकडे वळले. 'अरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' हे पुस्तक मी सुरुवातीस वाचले. नंतर थोड्याच दिवसांनी रामचंद्र पांडुरंग वैद्य यांचे 'पथ्यबोध' मासिक माझ्या हाती आले. त्यातील 'गुप्तरोग' ही कविता माझ्या पथ्यावर पडली. (कारण वाईट लोकांच्या संगतीने वाईट विचार, माझ्या मनात त्या वेळी वावरत होते.) माझे वाचन वाढू लागले तसा माझा असंतोषही वाढू लागला. विष्णुशास्त्री, आगरकर यांच्यासारखे आपणास मोठे का बनता येऊ नये असे मला वाटू लागले. मला छातीचे दुखणे होते. या रोगाच्या निवारणार्थ रात्री जसा मी गुडगुडीचा उपयोग करी तसा दिवसा मला वाचनाचा उपयोग होत असे. जेवढा वेळ मी वाचीत असे तेवढा वेळ मला बरे वाटे. अर्थात् वाचन मी खूपच करू लागलो. पण पुस्तकांचा पुरवठा आमच्या खेडेगावी पुरेसा कोठून असणार ? 'वृद्ध चाणक्य' वगैरे सर्व पुस्तके वाचून संपली. आता पुढे काय, या विचारात मी पडलो. घरात तुकारामबुवांच्या गाथेची एक प्रत पडली होती. ती मी सहज वाचायला घेतली. अभंग त्या वेळी मला फारसे आवडले नाहीत. पण आरंभीच्या तुकारामबुवांच्या चरित्राने माझ्या मनावर पगडा बसविला. आणि ते चरित्र मी कित्येक वेळा वाचले. तुकारामबुवांच्या चरित्रवाचनाने माझ्या मनात बरेच धैर्य निर्माण झाले.

## त्रि. स. शाडेकर

जवळजवळ चार तप मी वाचीत आहे. पण अजूनही मी अतृप्त आहे. गेल्या काही वर्षांत डोळ्याच्या विकारामुळे वाचन करणे मला अधिकाधिक कठीण होत जात आहे. तरी कुठेही चांगले नवे इंग्रजी पुस्तक दिसले की ते वाचण्याचा मोह मला अनावर होतो. मी ते मुद्दाम मागून आणतो. ( मात्र वाचून झाल्यावर आठवणीने परत करतो. ) पुस्तकाच्या दुकानातून अजूनही रिक्त हस्ताने माझे पाऊल बाहेर पडत नाही. काम करून मी कटाळलो अथवा काही कारणामुळे मन अस्वस्थ झाले म्हणजे ज्या निवडक पुस्तकांच्या सहवासाकरिता मी आतुर होतो ती सारी पुस्तके मी एका निराळ्या कपाटात ठेवलेली आहेत. या सर्व पुस्तकांची मी प्रत्येक मित्रास शिफारस करतो. मात्र त्यातले एकसुद्धा कोणाला वाचायला द्यायला मी तयार नसतो. या कपाटातच कॅथरिन पोर्टरचा 'फ्लॉवरिंग ज्युडा ' हा कथासंग्रह आहे. त्या संग्रहातील 'क्रॅक्ड लुकिंग ग्लास ' ही कथा, कथांची राणी आहे. ज्या कलाकृतीचा आस्वाद घेतल्यानंतर आपणाला तिचा विसर पडत नाही, तिच्यात काही ना काही मोठेपणाची चीज नक्कीच असली पाहिजेत. ती कथा मी १९४६ साली प्रथम वाचली. आता वीस वर्षे होऊन गेली पण पहिल्या वाचनाच्या वेळी तिने मला दिलेला आनंद व माझ्या भावनांचे व विचारांचे केलेले उद्बोधन याचा मला अजून विसर पडत नाही. जातिवंत कलाकृती ही अशी अप्सरेसारखी चिरतरुण आणि चिररुचिर असते.

## महाराज सयाजीराव गायकवाड

महाराजांची ज्ञानपिपासा दुर्दम्य होती. वयाच्या सतराव्या वर्षी त्यांनी वनस्पतिशास्त्र व जीवशास्त्र वाचले व अभ्यासले. एकदा पुण्याहून भल्या पहाटे उठून त्यांना नगरला जायचे होते. परंतु त्यांची आठवण

न राहून मध्यरात्रीपर्यंत ते वृक्षसंवर्धन शास्त्रावरील एक ग्रंथ वाचीतच राहिले आणि सकाळी त्याची धादल उडाली. त्यांचे वाचन सर्वव्यापी होते. नीतिशास्त्र, समाजशास्त्र, मानववंशशास्त्र, राजकारण व कारभार हे त्यांचे आवडते विषय असत. त्यांना वाचून दाखविणारा ( रीडर ) लागत नसे. ते स्वतः वाचीत व फार जलद वाचीत. वाचताना जवळ टिपणवह्या व शब्दकोश असायचाच. वाचलेल्या पुस्तकावर टिपणे लिहायचीच. त्याचा त्याना कधी कटाळा येत नसे. पुस्तक वाचून झाल्यावर ते केव्हा व कोठे संपले हे ते अवश्य नमूद करीत. याप्रमाणे त्यांचे रोज चारपाच तास वाचन चाले. त्यांनी वाचलेल्या पुस्तकांच्या किती टिपणवह्या झाल्या असतील कोण जाणे !

**गोळवलकर गुरुजी :**

इंग्रजी शाळेत असताना माधवरावांचे वाचन अधिक होऊ लागले. वर्गात चालू असणारा विषय घरी आधीच झालेला असायचा. वर्गात तर बसायचेच पण पुन्हा तोच विषय ऐकण्यात वेळ फुकट घालवायचा नाही, यावर त्यांचा कटाक्ष असे. ते कधी कधी पाठ्यविषयाबाहेरील पुस्तके ही वर्गात वाचीत असत. हे वाचन चालू असतानासुद्धा शिक्षकाच्या बोलण्याकडे साधारण लक्ष असायचे. त्यांचे लक्ष नसावे या कल्पनेने शिक्षकांनी ' आता हा मुलगा वाचीत होता त्यापुढे वाच पाहू ' अशी परीक्षा पाहण्याचा प्रयत्नच केला तर ते भांबावून न जाता शांतपणाने उभे राहून पुस्तक उघडीत व वाक्य जेथे थांबविण्यात आले होते नेमक्या त्याच शब्दापासून पुढे वाचू लागत. कसे पकडल्याच्या पवित्र्यात असलेले शिक्षक अगतिक होऊन जात.

' वर्गात इतर पुस्तके का वाचतोस ? ' असा प्रश्न शिक्षक त्यांना कधी कधी करीत ते धीमेपणाने उत्तर देत की आपण शिकवीत

आहात तो विषय माझा पुरा झाला आहे. तेव्हा वेळ फुकट जाऊ नये या हेतूने दुसरे पुस्तक मी वाचीत आहे. शिक्षक कधी कधी रागाने त्यांना त्या विषयावरील प्रश्नही विचारीत. पण प्रश्नांच्या जाळ्यात ते सहसा कधी अडकले नाहीत.

**विन्स्टन चर्चिल :**

चर्चिल यांना वाचण्याची आवड लावणारे पहिले पुस्तक, त्यांना देणारी त्यांची लहानपणाची दाई मिसेस एव्हरेस्ट ही होय. 'अश्रू न टाळता वाचन' अशा नावाचे ते पुस्तक होते. या पुस्तकामुळे त्यांना वाचनाची मोठी गोडी लागली हे खरे. मात्र वडीलधारी माणसे किंवा शिक्षकवर्ग यांनी सुचवलेली पुस्तके ते कधीच वाचीत नसत, तर स्वतःला आवडणारी व स्वतः निवडलेली पुस्तकेच ते वाचीत. आपण नऊ वर्षांच असताना वडलांनी आपणास 'ट्रेझर आयलंड' हे पुस्तक आणून दिले होते. ते आपणास इतके आवडले की, आपण त्याची पुन्हापुन्हा पारायणे केली असे ते सांगतात.

वाचनाचा हा त्यांचा नाद सारखा वाढतच गेला. पण तरुणपणी एकदा या नादाने त्यांना खरोखरच हात दिला. बोअर युद्धात ते शत्रूच्या हातात पडले व युद्धकैद्यांच्या एका छावणीत डांबले गेले, पण संधी साधून चर्चिल या तुरुंगातून निसटले. तुरुंगाच्या भिंतीवरून एका काळोख्या रात्री चढून ते बाहेर आले. रात्रभर पायी प्रवास करीत ते एका कोळशाच्या खाणीजवळ आले. ज्या कामगाराचे दार त्यांनी ठोठावले तो योगायोगाने इंग्रज होता. जरुरीचा माणूस म्हणून केवळ बोअर लोकांनी त्याला खाणीत राहू दिले होते. त्या कामगाराने पहाटेच्या काळोखातच चर्चिलना आपल्या खाणीत जमिनीच्या अगदी गर्भात आणून लपविले. त्याने बरीचशी पुस्तके चर्चिलच्या स्वाधीन केली

आणि तो म्हणाला, 'तुझ्या सुटकेची पुढील व्यवस्था करीपर्यंत ही पुस्तके वाचीत येथेच दडून राहा तू'.

त्या अधारेश, कोंदट खाणीत सुटकेची सोय होईपर्यंत दिवस कसे काढायचे हा चर्चिलेला प्रश्नच पडला होता. पण पुस्तके हाती पडताच ते खुलले. 'हरकत नाही सुटका सावकाश झाली तरी!' ते म्हणाले. पुस्तकाचा आस्वाद घेत ते त्या कोंदट कोळशाच्या भुयारात दोन दिवस दडून राहिले. त्या बिकट प्रसंगी वाचनानेच त्यांना हात दिला खरा !

## डॉ. ग. य. चिटणीस :

सर नारायणराव चंदावरकर हे कलकत्त्याला आले असताना मी त्यांना भेटायला गेलो. भेटीनंतर थोड्या वेळाने सर नारायणराव आंघोळीसाठी उठले. एका बुक-केसमधून एक पुस्तक काढून त्यांनी ते माझ्या हाती दिले. ते म्हणाले, 'तुम्ही आता इथेच जेवून जा. जेवण तयार होईतो तुम्ही हे पुस्तक वाचीत बसा.' इतके बोलून ते आत निघून गेले. मी हातातील पुस्तकाकडे पाहिले. किती सुंदर होती त्याची बांधणी ! तशाच प्रकारची पुस्तके काचेच्या कपाटात व्यवस्थित-पणे मांडून ठेवलेली होती. मी हातातील पुस्तक उघडून पाहिले ते रस्किनचे 'सीसेम ॲन्ड लीलीज' हे होते. ते मी पूर्वीच वाचले असल्यामुळे, वेळ कसा काढावा याची चिंता वाटू लागली. मी उठलो आणि काचेच्या कपाटातील पुस्तकाचे निरीक्षण करू लागलो.

त्या वेळी स्टुडंटस् ब्रदरहूडतर्फे सर नारायणराव यांचे एकदा भाषण झाले. बोलताना ते म्हणाले, 'हल्लीची तरुण पिढी बौद्धिक दृष्ट्या अतिशय बेशिस्त आहे. त्याच वाचनाकडे मुळीच लक्ष नाही. आज माझं कार्लाईलवर भाषण आहे. पण माझी खात्री आहे की, जमलेल्या

मर्च्लीपैकी कार्लाईलच सर्वात महत्त्वाचं पुस्तक Sartor Resartus हे कुणी वाचलेलं नाही. हे ज्यान वाचल असेल त्यान हात वर करावा '

मी शेवटच्या बाकावर बसलो होतो तेथे मी उभा राहिलो आणि हात वर केला. मला वाटले, ते आता माझी त्या पुस्तकाबाबत जाहीर परीक्षा घेणार, पण माझी धिटाई पाहून सर नारायणरावानी तरुण पिढीबद्दल आणखी काही न बोलता कार्लाईलवर बोलायला सुरुवात केली.

## श्रीपाद अमृत डांगे

हरी नारायण आपटे यांचे ' उष:काल ' हे डांगे याना आवडलेले पहिले पुस्तक डांगे इंग्रजी पहिल्या इयत्तेत असताना ते प्रसिद्ध झाले होते. त्या पुस्तकाची स्तुती ऐकून ते वाचण्याची त्यांच्या मनाला उत्सुकता लागून राहिली होती. थोडेसे पैसे साठवून ते पुस्तकाच्या दुकानी ते विकत घ्यायला गेले. भीतभीतच त्यानी त्या पुस्तकाची किंमत विचारली. पुस्तक विक्रेता म्हणाला, ' किंमत फार आहे त्या पुस्तकाची ! तू कुठून आणणार इतके पैसे ? '

' पण किती ? ' डांगे यानी विचारले

' दीड रुपया. '

डांग्यानी खिशातून पैसे काढले व दुकानदारासमोर ठेवीत ते म्हणाले, ' द्या तर ते पुस्तक मला '

त्यांच्यासारख्या चिमुरड्या मुलान खिशातून चटकन दीड रुपया काढून पुस्तक विकत घ्यावे याचा त्या विक्रेत्याला अचंबा वाटला असावा. त्यांच्याकडे निरखून पाहात तो म्हणाला, ' चोरून तर आणले नाहीस ना तू हे पैसे ? जा आईला घेऊन ये तुझ्या ! '

आताप्रमाणे, इतके पैसे त्या वेळी लहान मुलांच्या हाती सहसा येत नसत. आणि म्हणूनच दुकानदाराला त्याचे आश्चर्य वाटले होते. डांगे त्या वेळी आपल्या एका मित्राच्या घरी राहात असत. ते परत आले व मित्राच्या आईला बरोबर घेऊन परत त्या दुकानात आले. मित्राच्या आईने खात्री दिल्यावर मग त्या दुकानदाराने ते पुस्तक डांग्याना विकत दिले आणि ते फाऊंटनस मारून डांगे उड्या मारीत निघाले.

ते पुस्तक त्याना आवडले तर खरेच, पण त्याच्या मनावर त्याचा फार परिणामही झाला. त्या पुस्तकातील गूढ वातावरण, गुप्त वेष वगैरेंची वर्णने वाचून डांगे गुप्त कट करण्याच्या प्रयत्नात सामील झाले होते.

ते इंग्रजी पाचवीत असताना, मॅट्रिकमधील एका विद्यार्थ्याबरोबर त्यांची दोस्ती जमली होती. त्याच्या घरी रेनॉल्डस्‌च्या सगळ्या कादंबऱ्यांचा सेट होता. ही पुस्तके मद्रास येथे छापलेली हाता आणि सहा आण्याला एक याप्रमाणे ती विकत मिळत असत.

एकदा वर्गात ' लंडन येथील बड्या लोकांची गुप्त कृत्ये ' हे पुस्तक वाचीत असताना डांगे मास्तराच्या तावडीत सापडले, आणि मास्तरांनी शिक्षा म्हणून त्याना २५ छड्या मारल्या.

पण या शिक्षेमुळे रेनॉल्डस् वाचण्याची त्यांची सवय काही सुटली नाही. त्यानंतर काही दिवसांनी मास्तरानी विचारले, ' काय, रेनॉल्डस् वाचायचा सोडला की नाही ? '

मास्तराना वाटले होते की, २५ छड्यांच्या शिक्षेने ते पार सुधारले असतील पण डांग्यांनी उत्तर दिले ' नाही, मास्तर त्याची सातवी कादंबरी सध्या मी वाचतोय. '

' सोल्जर्स वाईफ ' ही रेनॉल्डस्‌ची कादंबरी ते त्या वेळी वाचीत होते व ती त्याना फार आवडली होती. त्या कादंबरीमुळेच फटक्याच्या शिक्षेविरुद्ध

फायदा करावा असा प्रचार झाला होता. रेनॉल्डस्च्या पुस्तकाच्या वाचनामुळे डांगे यांची वाचनाची आवड दुणावली हे खरे.

**म. म. दत्तो वामन पोतदार :**

पुण्यात कमन्याच्या बाजूस पूर्वी जुना बाजार होता. दर बुधवारी व रविवारी बाजार भरे. त्या बाजारात पुस्तक विकायला येत (अर्थात् जुनी) या जुन्या बाजारात जाण्याचा दत्तोपताना छंद लागला होता. लहानपणी दक्षिणेचे मिळणारे पैसे ते साठवीत असत. वर्षअखेर रुपया, बारा आणे जमत. ते ते तसेच ठेवीत. आतासारखी पैसे खरचण्याची साधने त्या वेळी उपलब्ध नव्हती हॉटेले नव्हती. सिनेमे नव्हत. तेव्हा पैसे खर्चायचे कसे हा त्याना प्रश्नच असे.

त्या जुन्या बाजारातून ते पुस्तके विकत आणीत. पुस्तकाची किंमत काय पडे? दोन पैसे, किंवा एक पैसा ! पुस्तके मात्र या बाजारात नाना तऱ्हेची मिळत. आणि पुस्तके घेण्यासाठी तिथे काही प्रसिद्ध माणसही येत असत. साहेबलोक सेवानिवृत्त होऊन जेव्हा विलायतेला परत जात तेव्हा ते इथे जमा केलेली पुस्तके विकून टाकीत. रद्दीवाले ही पुस्तक विकत घेऊन नतर त्याचा लिलाव करीत व ती पुस्तके या बाजारात येत. बाजारात जाऊन दत्तोपत दर आठवड्यास पुस्तके चाळीत असत आणि त्यामुळेच ती विकत घेऊन त्याचा सग्रह करण्याचा त्याना नाद लागला. त्या जुन्या बाजारात खरेदी केलेल्या पुस्तकापैकी स्कॉटचे कवितेचे पुस्तक 'मर्मेड' हे अजूनही त्यांनी जपून ठेवलेले आहे.

**अॅड. खंडेराव त्र्यंबक सुळे**

'शेष' या टोपण नावाने वाङ्मयीन टीका लिहिणारे अॅड. खंडेराव त्र्यबक सुळे हे आपल्या वाचनाच्या पद्धतीबद्दल असं सागतात

पुस्तक वाचण्याची माझी पद्धती मात्र एकच मग ते पुस्तक कुठल्याही विषयाच असो. ही पद्धती म्हणजे वाचताना आपल्या व दुसऱ्याच्याही पुस्तकावर भरमसाट खुणा करायच्या. या सवयीच एकदा मला चांगल प्रायश्चित्त मिळाल नाशिकच्या तुरुंगात असताना एकदा माझ्याबरोबर खर्डीकर म्हणून दुसरे एक कार्यकर्ते होते. ते रशियन भाषेचे तज्ज्ञ होते. तुरुंगात आम्ही एकमेकांची पुस्तके बदलून वाचीत असू. एकदा खर्डीकराकडून घेतलेल्या त्यांच्या एका पुस्तकावर मी वाचताना असाच भरमसाट खुणा केल्या. आपल्या पुस्तकावर मी केलेल्या त्या खुणा पाहून श्री. खर्डीकर असे काही संतापले की राग न आवरून त्यांनी फाडकन म इया थोबाडीत मारली. काय करणार ! गाल चोळीत बसलो झाल !

मला स्वत ला, पुस्तकावर खुणा करू नये अस मनापासून वाटत. पण पुस्तक वाचायला लागल्यावर मात्र खुणा केल्यावाचून राहवत नाही हे खर. खर्डीकराच्या हातची थोबाडीत खाऊनसुद्धा पुस्तकावर खुणा करण्याची माझी ही खोड काही सुटलेली नाही

श्री. चिं. द्वा देशमुख '

भारताचे माजी अर्थमंत्री माननीय श्री. चिंतामणराव देशमुख याना विद्यार्थिदशेपासूनच अत्यत चिकित्सक रीतीने वाचण्याची सवय होती. वाचलेल्या ग्रथातून टिपणे घरून घेण्यास ते कधीही विसरत नसत. घरलेल्या टिपणाच्या वह्या ते काळजीपूर्वक सांभाळूनही ठेवीत. त्यांच्या टिपण-वह्यांचा त्याना पुढे कसा उपयोग होत असे याचे एक उदाहरण इथे सांगण्यासारखे आहे.

स्वातंत्र्यवीर वासुदेव बळवत फडके याचे शिरढोण येथे स्मारक करण्याचे ठरल्यानतर त्या स्मारकाचे उद्घाटन, चिंतामणराव देशमुख हे कुलाबा जिल्ह्यातील असल्यामुळे, त्यांच्याच हस्ते व्हावे असे घाटले

देशमुखानी त्याला मान्यता दिली. पण कार्यबाहुल्यामुळे त्याना त्या प्रसगी करावयाच्या समयोचित भाषणाची जुळवाजुळव करण्यासाठी मुळीच अवधी मिळाला नाही. फडक्याची चरित्र विषयक माहिती वाचणे किंवा त्यावरील पुस्तके मिळवणे शक्य झाले नाही तरी त्याना आठवत होते की आपण ल्हानपणी फडक्याचे एक चारित्र वाचलेले आहे व त्यातील टिपणेंही आपल्या एका वहीत टिपून ठेवलेली आहेत त्यांनी आपल्या जुन्या टिपणाच्या वह्या शोधून काढल्या.

समारभ प्रसगी ते जेव्हा बोलायला उभे राहिले तेव्हा त्यानी आपल्या खिशातून ती छोटीशी जुनी वही बाहेर काढली व त्यातील पाने उल्टीत हुतात्मा फडके याच्या चारित्रावर बोलण्यास सुरुवात केली. त्या जुन्या त्रोटक टिपणाच्या आधारावर ते सुमारे पाऊण तासपर्यंत बोलले.

त्याचे भाषण आटोपल्यावर कार्यकर्त्यांपैकी एकाने त्याना विचारले, 'आपण त्या ल्हानशा चोपडीत मधून मधून काय पाहात होता ?'

तेव्हा चिंतामणराव हसून म्हणाले, 'ल्हानपणी मी फडक्याच चरित्र वाचल होत. त्यावेळी मी काही टिपण केली होती. त पुस्तक वाचताना माझ्या मनात जे काही विचार उद्‌भवले होते तेही मी त्यावेळी टिपून ठेवले होते. आता या प्रसगी मला फडक्याबद्दल नव्याने काही वाचण्याइतकी पुरसतच झाली नाही म्हणून त्या जुन्या टिपणाच्या आधारानेच माझे आजचे भाषण करण्याचे ठरविले होते

परिश्रमपूर्वक केलेल्या वाचनाचा व टिपणाचा उपयोग हा असा होऊ शकतो.

• • •